॥ नटेश्वर प्रसन्न ॥

# संगीत गोपीचंद नाटक.

(तीन अंकी.)

रचणार

**अनंत वामन बरवे,**

सुदाम–प्रल्हाद–कृष्णसखी मिराबाई, शारदामंडण–शुकरंभा–
आण्णासाहेबांची धांदल–समजुतीचा घोटाळा–इत्यादि
गद्यपद्य नाटकांचे कर्ते आणि

सेक्रेटरी, भारतनाट्यसमाज, पुणें.

प्रकाशक–शंकर हरी मुळे,

मालक, महाराष्ट्र ग्रंथालय बुधवार पेठ, पुणें.

मुद्रक

शंकर नरहर जोशी, म्यानेजर— 'चित्रशाळा' प्रेस,

८१८ सदाशिव पेठ, पुणें शहर.

---

किंमत दहा आणे.



# या प्रयत्नाचें तात्पर्य काय ?

अध्यात्मदृष्टीनें गोपीचंदाचे आख्यानाचा विचार केला–असतां, धार्मिक वृत्तीच्या मनुष्याची कशी कशी उन्नति होत जाते हें लक्षांत ठेवण्यासारखें आहे. आरंभीं प्रत्येक मनुष्य ' बद्ध ' अवस्थेंत असतो. संसारांतल्या अनेक मोहपाशांनीं त्याचें मन जखडून गेलें असतें. तें इतकें कीं, जरी या प्रपंचसुखांत त्याला पूर्ण व शुद्ध समाधान नसतें, तरी त्यांतून निसटून अन्य कांहीं अधिक सुखस्थितीची कल्पनाही त्याच्यानें करवत नाहीं, आणि कोणीं केलेली त्याला रुचत नाहीं. पण प्रापंचिक पसाऱ्यांत असा तडफडत असतां तेथेंच एखादेवेळीं त्याला एखाद्या आपत्तीचा किंवा मोठ्याशा हानीचा असा तडाखा बसतो कीं, त्यांत तत्काल त्याला विरक्ति उत्पन्न होऊन अशा स्थितींतून तरणोपाय कांहीं मिळेल काय या चिंतनाला तो लागतो. मनुष्याची दुसरी ' मुमुक्षु ' अवस्था म्हणतात ती ही होय. या अवस्थेंत सद्गुरूची प्राप्ति झाली व त्याला गुरुकृपेनें त्याच्या अधिकारानुरूप पुढील तरणोपायाचा मार्ग मिळाला, म्हणजे एकनिष्ठेनें जें त्या मार्गाचें अनुसरण त्याचेकडून होतें, त्या अवस्थेला मनुष्याची ' साधक ' स्थिति असें म्हणतात. या मार्गानें इष्ट साधनें करतां करतांच यांत मनुष्य पूर्णत्वाला पोंचला–त्याला परमात्मसाक्षात्कार झाला,—म्हणजे त्याला मग ' सिद्ध 'त्वाची योग्यता येते. तो प्रपंचांत पुढें राहिला तरी जीवन्मुक्त अशा तऱ्हेनें राहून वैषयिक कसल्याहि मोहानें तो लिप्त होत नाहीं. शुद्ध व स्वयंतृप्त अशा अत्यंत उन्नत वृत्तीनें ही जीवयात्रा तो संपवून सद्गतीला जातो. गोपीचंदाचें हें आख्यान अध्यात्मदृष्टीच्या या चारही वृत्तींचें स्पष्ट द्योतक आहे व याच तऱ्हेनें तें प्रेक्षकांस तात्पर्यसूचक व्हावें, अशी, हें या नाटकरूपानें सादर करणाराची इच्छा आहे. **श्रीनटेश्वर**कृपेनें ही इच्छा पूर्ण होवो.

# पहिल्या अंकांतील पात्रें व देखावे.



**सूत्रधार** आणि त्याचे दोघे पारिपार्श्वक.

**कानिफनाथ**—जालंदरनाथाचा शिष्य.

**गोरखनाथ**—मच्छिंद्रनाथाचा शिष्य.

| | |
|---|---|
| **मलयगंधिनी.** <br> **केशरंजनी.** <br> **विशालाक्षि.** <br> **शीतवर्षिणी.** <br> **प्रियदर्शिनी.** <br> **मंजुभाषिणी.** | गोपीचंदाच्या दासी. |

**रूपक्या**—गोपीचंदाचा खुषमस्कऱ्या.

**अतिशयोक्ति**—रूपक्याची बायको.

**मैनावती**—गोपीचंदाची आई.

**गोपीचंद**—सुंदरपूरचा राजा.

**१ देखावा**—आंब्याचें झाड. आंबे खालीं पडणें व पुन्हां त्यांतले कांहीं वरती जाऊन लटकणें.

**२ देखावा**—तिसऱ्या प्रवेशांत सज्जाचा देखावा. मैनावती उंच आसनावर असून शेजारीं खालच्या अंगास गोपीचंदाची बैठक.

हो

॥ नटेश्वर प्रसन्न ॥

# संगीत गोपीचंद नाटक.

( रा. रा. अनंत वामन बरवेकृत. )

## अंक पहिला.

( धृपद—परब्रह्म सुखनिधान. )

नमो नाथ आदिनाथ ॥ सचराचरभूतनाथ ॥ पदप्रणतसंकट-हर ॥ न० ॥ चरणकृपें तव अनाथ ॥ होत भक्तगण सनाथ॥ भवजलधिहि त्यास सुतर ॥ न० ॥ विषयभोग रोग गमति ॥ योगनिरत होय वृत्ति ॥ दत्तगुरु जय दिगंबर ॥ न० ॥

( चाल—नमित मी त्या घननील मुकुंदा. )

गुरुचरणाब्जविलीन होय मन ॥ तरिच मिळे कैवल्यसुखा-सन ॥ गु० ॥ अभयगुरुकृपाकर तो मिळतां ॥ उद्धरतां ये भवजलपातिता ॥ नातरि षडरिकरीं सांपडतां ॥ होय कसें भवबंधविमोचन ॥ गु० ॥

( पद्य संपण्याचे सुमारास पडद्यांत ' अहलख ' ' जय गुरुनाथ ' असे शब्द ऊन एका बाजूनें कानिफ व एका बाजूनें गोरख येतात. )

**कानिफ**—बेटा, धन्न है तूं.

**गोरख**—श्रीगुरूका स्मरण तूनें यथार्थ किया.

**कानिफ**—यह तेरी गुरूनाथकी अस्तुती सुनकर बहोत आनंद हुवा.

**गोरख**—इसी राहसे चलनेमें तेरेपर अवश्य गुरूकी कृपा होगी.

( पारिपार्श्वक जातात. सूत्रधार पुढें येतो. )

**सूत्रधार**—सांई, आपणा उभयतांना मी प्रणाम करतों.

**गो० का०**—कल्याण, कल्याण !

**सूत्रधार**—अहाहा ! खरोखर आपल्या रूपानं मला ह्या परमेश्वरमूर्तींच भेटल्या असं म्हटलं पाहिजे. मोठंच भाग्य हें.—

( चाल–साध्य नसे मुनि कन्या. )

**मंगल या स्तवनानें ॥ जणुं दर्शन हें दिधलें प्रभुनें ॥ मं० ॥ अज अव्यक्त प्रभुची विभुती ॥ विषयांधा या दृश्य नव्हे ती ॥ म्हणुनि अनुग्रह करितो ॥ जणुं तो विचरुनि या रूपानें ॥ मं० ॥ सहवासें जी सेवा यांची ॥ घडुनि रुचि मिळे बोधसुधेची ॥ तेणें परमार्थाची ॥ प्राप्तिच होते या योगानें ॥ मं०॥**

—सांईमहाराज, चरणापाशीं या दासाची एक विनंति आहे.

**गो० का०**—हां ? वो क्या भला ?

**सूत्रधार**—आपल्या आशिर्वादानं नेहमीं असं असावं हा हेतु आहे.—

( चाल–शृंगा ताडोनी डोहीं. )

**पुण्यकथाश्रवणीं ॥ उत्सव ॥ राहुं अखंड जनीं ॥ त्यांतिल हितवचनीं ॥ अविरत ॥ रत व्हावें त्यांनीं ॥ सत्कविकृतिचा आदर ठेवुनि ॥ बोधामृतपानीं ॥ प्रेमें ॥ विहरुंत दिनरजनीं ॥ प्रेमें ॥**

**गोरख**—जा बेटा, सद्गुरुनाथकी कृपासे यह तेरी मनषा अवश्य पूरी होगी.

**कानिफ**—सुन बेटा, सामने आमका वृक्ष है. उसिकेपास जाकर खडा रहे. हमारी आग्यासे वो तेरेको परशाद देगा. यह परशादी सद्गुरुकी है ऐसा समझ हो.

( सूत्रधार आंब्याच्या झाडाजवळ जातो. झाडावरून एकाएकीं आंबे खालीं पडतात. )

**गोरख**—सांई, आप कौन हैं, कहासें आये; आपके गुरूकी क्या यही करामत है ?

**कानिफ**—सांई, सुनलीजिए. मय गुरु जालंधरनाथका चेला कानीफ़ हूं. गुरुकी आग्याके अनुसार कई प्रमत्त राजपुरुषोंको सद्गुरु परभावसे अंकित कर नाथदीक्षा देते देते अब मय आपने गुरूको मिलने चला हूं. आप हमारे गुरूकी करामत पूछते हो तो ऐसे आप कौन; आपका गुरु कौन; और आप किस राहपर चलते हैं ?

**सूत्रधार**—( पुढें येऊन ) सांई, आज्ञेप्रमाणें प्रसाद ग्रहण केला.

**कानिफ**—क्या, इतनाहि बस हो गया ?

**सूत्रधार**—सांई महाराज,—

( चाल—भूपती खरे ते वैभव. )

**प्रभु अनंतकर जैं सिद्ध होइ द्यायाला ॥ तंई नर द्विकर हा समर्थ किति घ्यायाला ॥ घन उदारमतिनें संवर्षे जलधारा ॥ नदनद्यांस दुर्धर तो वारांशी सारा ॥ ईश्वरी अशी ही दया अपारचि असतां ॥ वासना हवी ती प्रबल कासया चित्ता ॥**

**कानिफ**—बराबर है बेटा; भगवत्कृपाके ओर ध्यान दे कर ऐसी संतोख बृत्ति रखनेसेहि यह बासना किर्मूल होसकती है. नहीं तो भोगादिकसें हम उसको पूर्ण करते शांत करेंगे ऐसा कहें तो यह बिलकुल अशक्य है. स्नेह या घृत डालनेसे अग्निज्वाला अलबत बढ जाती है. शांत नहीं होती.

**गोरख**—सत् है सांई.

**सूत्रधार**—असो, उभयतांची मला आतां आज्ञा असावी.

**कानिफ**—जा बच्चा, आनंदमें रहे.

**गोरख**—सद्गुरुनाथ तेरा भला करें.

( सूत्रधार प्रणाम करून जातो. )

**गोरख**—सांई साहाब, अब ये नीचे गिरेहुवे आम काहेको ऐसे रहेने देते हो; फिर ये सब उसी वृक्षको लटका दीजिए.

**कानिफ**—अब यह आम फिर उसी जगे लगाना इसीमें आपके गुरूकी जो कुछ करामत हो, दिखलाईये.

**गोरख**—अच्छा तो गुरूकी कृपासे वैसाभि हो जायगा ( पडलेल्या आं-ब्यांस उद्देशून ) जाव, आपने आपने जगेपर फिर सब लटक जाव !

( उरलेले आंबे सर्व झाडाला जाऊन चिकटतात. )

**कानिफ**—वाहवा ! बेशक आप किसी सच्चे गुरूके चेले है. कहिंये आपका नाम और गुरुसंप्रदाय.

**गोरख**—सांई, तात्विकदृष्टिसे मय आपको उत्तर दूं तो मेरा गुरु सच्चिदानंद स्वरूप है. सब आविद्या जलाकर उसीकी कियी हुई रच्छा यह मेरे शरीरको अलंकाररूप हो रही है. अखंड तत्वचिंता यह मेरी जपमाला है. संपूर्ण नामरूपकी झोली करके उसीमें चारों मुक्ति डालकर मैंने आपनी बगलमें दबा रख्खी है. नाथ संप्रदायका प्रसार यह सैली गलेमें धारन कर, बरम सत् जगन्मिथ्या यह शृंगीनाद करते करते मय चलाहूं.

**कानिफ**—( प्रेमानें भेटून ) वाहवा ! तो आपकी और हमारी येकही राह है !

**गोरख**—सत् है. अब वेव्हारदृष्टीसे कहें तो मय मछंदरनाथका चेला हूं. मेरा नाम गोरख. मयभि उनकी आग्याके अनुसार अनेक दुष्ट चक्रबर्तियोंको शासन करते हुवे नाथसंप्रदायका उपदेस करते करते आपने गुरूसें मिलने चलाहूं. सुनो कानिफनाथ, फिरते फिरते तुम्हारा गुरु जो जालंधरनाथ उनकी कुछ कुबार्ता समझनेमें आई, वो ऐसी के, बंगालेकी ओर एक सुंदरपूर नामका सहर है. वहांका राजा गोपीचंद, बडा उन्मत्त है. उसीने गुरू जालंधरनाथको खाईमें डालकर ऊपर घोडेकी लीद फेंक दियी है. तुम आपने गुरूके सच्चे चेले हो तो उनको खाईमेंसे निकालनेकी शीघ्र तजवीज करो.

**कानिफ**—अवस्य करेंगे. हमारे गुरूका पता तुमने बतलाया इसके बदले अब हमभि आपके गुरूकी बार्ता जो सुनी है वो कहेताहूं. सांई, तुम्हारे गुरू मछंदरनाथ, मलियाल देसके इस्त्रियोंके राज्यमें वहांकी रानी जिसको परिमला कहेते हैं उसीके प्रेमजालेमें फंस रहे हैं. तुम उनके सच्चे चेले दिखते हो तो उनको उस जालेमेंसे छुडाना तुम्हाराभि कर्तव्य है.

**गोरख**—बहोत अच्छा. आप बंगालेकी तरफ जाईये, मयभि मलियाल्के इस्त्रियोंके राज्यमें जाकर किसीभि करामतसे आपने गुरूको लेकर उस सुंदरपूर शहरमें आतां हूं. अब आपका पुनर्दर्शन वहां होगा.

**कानिफ**—अच्छा, आदेस. आदेस.

**गोरख**—आदेस, सांई आदेस !

( ' अहलक ' करीत दोघे दोहोंकडे निघून जातात. )

---

## प्रवेश २ रा.

( **स्थल**—गोपीचंद राजाचे जलमंदिरा बाहेरचा भाग—**पात्रें**, कांहीं राजस्त्रिया येतांना दृष्टीस पडतात. )

**सर्वजणी**—( मिळून )

( जयप्रभोविभो अगाध० या चालीवर )

**हं चला चला चला सकल सखि मिळुनी ॥ घ्या कनक कलश करिं भरुनी ॥ चला० ॥ बहुविध मृदुल स्पर्शसुखा-वह अंगराग सगळे ॥ निर्मियले सुपरिमळें तैलजलें ॥ हं चला० ॥ अतिशय सुंदर मणिमय मंदिर जलकेलिस्थल तें ॥ जणुं फुलतें किति खुलतें मन भुलतें ॥ हं च० ॥ सुरत्नभूषण-खचितप्रांगण खचित नभोंगणसें ॥ भासतसे शशि विलसे नृपति तसे ॥ हं० ॥**

**मलयगंधिनी**—अग पण महाराजांची स्वारी दरबारांतलं काम संपवून जलमंदिराकडे गेली का ?

**केशरंजनी**—तें सांगायला आतां आपला रूपक्या येईल. तंवर महाराजांना आज अभ्यंगस्नान घालतांना कुणी कुणी काय काय कामं वांटून घ्यायचीं तें ठरवून ठेवूं या म्हंटलं.

**विशालाक्षि**—हो गडे, बरं सुचवलंस. या; मीच सगळ्याजणींच्या कार्याची योजना करतें. तूं केशरंजनी, महाराजांचे केंस विंचरण्याचं काम तुझ्याकडे बरं का; तूं मलयगंधिनी, महाराजांच्या अंगाला परोपरीच्या सुवासिक उट्या लावण्याचं काम तुझ्याकडे, समजलीस; तसंच तूं म्हटलं शीतवर्षिणी, तूं महाराजांवर हलुहलु जलसिंचन करायचंस; आणि तूं बरंका प्रियदर्शिनी, महाराजांपुढें आरसा धरून उभं राहण्याचं तुझं काम.

**शीतवर्षिणी**—वः विशालाक्षि. तूं तर आज प्रत्येकीकडे तिच्या तिच्या नांवाप्रमाणंच कामांची योजना करून दिली आहेस ही.

**मंजुभाषिणी**—मुद्दामच केलंय तिनं तें. ह्मंजे, तिलाही मग आपल्याकडे आपल्या नांवाला योग्य असंच काम घ्यायला सांपडेल.

**केशरंजनी**—पण विशालाक्षींकडे तिच्या नांवाप्रमाणं ह्मंजे कोणतं काम देतां येण्यासारखं आहे बरं ?

**मंजुभाषिणी**—अगदींच सोपं ! अग हिनं नुस्तं तिथं उभं राहून महाराजांचा तो मनोहर अभ्यंगस्नानविधि आपल्या विशाल दृष्टीनं स्वस्थ पहात असायचं !

( सर्वजणी हंसतात. )

**केशरंजनी**—तरी म्हटलं आमची मंजुभाषिणी आहे !

**विशालाक्षि**—तूं कांहीं म्हण, पण कुणाचंही लक्ष क्षणभर वेधून जाण्यासारखीच महाराजांच्या त्या स्नानविधीची सुंदर शोभा दिसत असते, नाहीं बरं ?

**मंजुभाषणी**—हें बरीक खरं—

( या उपवनिंची किती तरि शोभा० या चालीवर )

**उदयगिरीवर समुदित शशिकर ॥ स्फटिक शिलेवर नयनमनोहर ॥ नृपवर दिसति तसे ॥ दर्शन तें प्रिय असतें सकलांतें ॥ होतें तेव्हां ॥ चित्त चकोरच नयनहि कुमुदिनि ॥ उदय० ॥**

—आतां एखाद्या विरक्त दृष्टीलाच अशा सुंदर देखाव्यानं त्रास वाटल्यास न कळे !

**केशरंजनी**—पण अशा आल्हादक दर्शनाचा त्रास वाटणारी मेली विरक्त-वृत्ति ती आमच्या या जलमंदिरांत असणार आहे तरी कुणाची ? इथं म्हटलं तर चहूंकडे वाज्यांत असंच दृष्टीस पडतं—

( चाल—जावोजि जावो नादान किस. )

**विहरति या स्थलिं रतिप्रियचि जन ॥ वि० ॥ विकच कमल-घन ॥ प्रसन्नदर्शन ॥ आर्शि मुखें न उदास कुणी क्षण ॥ विह० ॥ अभ्ररहित नभ ॥ तेंवि शुचिप्रभ ॥ सकलही भय-तापशून्यमन ॥ विह० ॥**

**मंजुभाषिणी**—हेंच खरं; विरक्त माणसांचीं हीं ठिकाणंच नव्हेत. त्यांचीं विहारस्थलं वेगळींच असतात—

( चाल—राजाहूं मै कोमका. )

**निर्जन वन वा तेथल्या ॥ उदास शैलगुहा ॥ विरक्तिला अति आवडतीं ॥ स्थानें तींच महा ॥ रुक्षपणा गुण राक्षसी ॥ मानूनि प्रिय तो ॥ नकळे देवपणा कसा ॥ वैराग्यें मिळतो ॥**

**मलयगंधिनी**—गडे, पण आज दरबारांतनं उठायला महाराजांना इतका उशीर तो कां बरं झाला आहे ?

**विशालाक्षी**—हा बघ रूपक्या आला. आतां कळेल काय तें.

( रूपक्या येतो. )

**रूपक्या**—अहाहाहाहाहा ! जसा कांहीं आकाशांतील तारकांचा पुंज; अथवा गोकुळांत गोपी गोळा होत असत तो यमुनातीरचा एक मनोहर वृक्षकुंज; अस्सा भास इथं या वेळीं होतोय हा !

**केशरंजनी**—भास कशाला ? क्षणभर तस्संच म्हटलंस तरी हरकत नाहीं. आम्हीं गोपी; महाराज गोपीचंद म्हणजे श्रीकृष्ण; आन् त्या गोपींशीं केव्हांही सरळ उत्तरानं न बोलणारा तूं एक पेंद्या अगर वांकड्या !

**विशालाक्षी**—पुरे झालीं हीं रूपकं. महाराज दरबारांतनं उठून स्नानशालेकडे आले कीं नाहींत हें सांग बरं अगोदर.

**रूपक्या**—हें पहा, सूर्य आपला करभार आंवरून जसा पश्चिम समुद्रांत प्रवेश करतो, तसाच महाराजांनींही राज्यकारभार आटोपून जलमंदिरांत प्रवेश केला आहे. आतां चंद्राच्या भोंवतीं जशा नक्षत्रमाळा, पर्वत शिखराभोंवतीं जशा मेघमाला, राजमंदिराभोंवतीं जशा घोडशाळा अथवा नंदीच्या गळ्याभोंवतीं जशा घुंगुरमाळा तशा तुम्हीं त्यांना वेष्टून उभ्या रहा कशा !

**केशरंजनी**—अन् तूं रे ?

**रूपक्या**—सूर्यास्त झाल्यावर पक्षी जसे घरट्यांत जातात, अथवा दिवसभर कुरणांत चरलेलीं जनावरं लठ्ठ पोट बनून जशीं गोठ्यांत शिरतात, तसा मीहि घरीं जाऊन स्वस्थ पडतों.

**विशालाक्षी**—पण विश्रांतीच्या वेळीं तर तूं पाहिजेसच महाराजांपाशीं करमणूकीला.

**रूपक्या**—पण पंचपक्वान्नाचं ताट जसं पुढं असल्यावर दृष्टि मग कदन्नाकडे जायची नाहीं, तशा आतां हजारों विलासपुतळ्या जवळ असल्यावर महाराजांना माझी आठवणही होण्याचा संभव नाहीं.

**केशरंजनी**—विशालाक्षि, तो बघ नांवाचा रूपक्या आहे. तुला का बाई तो बोलण्यांत आटपणार. त्याला उत्तरं देणार त्याची बायकोच भली खंबीर. महाराजांनीं गमतीनं यांचीं नांवं ठेवलीं आहेत त्याप्रमाणं हा रूपक्या तर ती अतिशयोक्ति !

**रूपक्या**—बरोबर. जशी रसिकाला कविकृति, नाविकाला समुद्राची भरती, सुधारसाच्या जोडीला ऊन ऊन चपाती—

**केशरंजनी**—नव्हे या व्यतिपाताच्या जोडीला ती वैधृति.—

**विशालाक्षी**—अंहः मी म्हणलें, या दगडाला ती चिखलमाती !

**रूपक्या**—कां होईना, तशीच मला ती !

( सर्वजणी हंसतात. )

**केशरंजनी**—अरे पण रूपक्या—रसिकाला म्हटलं म्हणजे कविकृति प्रिय असते तसं तुमचं कुठं आहे ? गांठ पडतांच भांडणाला सुरवात !

**रूपक्या**—पण काव्यांतही जशी कांहीं क्लिष्ट काव्यं असतातच; कीं त्यांचा चांगला शब्दच्छल केल्यावांचून त्यांतला रसास्वाद घेतां येत नाहीं; तसंच कांहीं कठीण स्वभावांच्या माणसांशीं कलहवृत्ति ठेवल्यावांचून त्यांच्यांतलाही खरा खरा प्रेमरस बाहेर पडत नाहीं. परस्परांच्या स्वभावानुरूप नवराबायकांतल्या प्रेमांचे अलीकडे मीं कांहीं संप्रदाय ठरविले आहेत.

**विशालाक्षी**—प्रेमांचे संप्रदाय; नवलच हें. मग ते ऐकूं दे तरी.

**रूपक्या**—ऐकून घ्या. म्हंजे तुम्हालाही त्यांत आपण कोणत्या संप्रदायाचे आहों हें समजून ठेवतां येईल. हें पहा, जसं कृपणाचं धन अगर खुनशी माणसाचं मन, तसं ज्या नवराबायकोचं प्रेम अगदीं गूढ असतं, म्हंजे तीं एकमेकांशीं भाषण करतांना सुद्धां कधीं कोणाला आढळत नाहींत; अशांच्या प्रेमाला मी ‘ काकसंप्रदाय ’ म्हणत असतों. जशी उद्धट माणसाची विद्या तशी ज्या नवराबायकोंची प्रीति उघड दृष्टीस पडते; म्हंजे तिऱ्हाइत अथवा वडीलधाऱ्या माणसांची परवा न ठेवतां खुशाल ज्यांचा हास्यविनोद चालतो, त्यांच्या प्रेमाला मीं ‘ श्वानसंप्रदाय ’ हें नांव दिलं आहे. आणि आम्हां दोघांत आहे तसल्या कलहप्रचुर प्रेमाला मीं ‘ मार्जारसंप्रदाय ’ ठरविला आहे ! मांजराप्रमाणें आम्हीं कितीहि गुरगुरलों, फुरफुरलों, गडबडलों, कोळमडलों तरी आमचं भांडण म्हणजे प्राणयकणांचं कांडण अथवा प्रीतिरसाचं गुऱ्हाळ !

**विशालाक्षि**—ही पहा तीच आली इकडे. पाहूं या आतां उभयतांच्या प्रीतिरसाचे किती व कसेकसे लोट बाहेर पडताहेत ते !

( अतिशयोक्ति घाबऱ्यां घाबऱ्यां येते. )

**अतिशयोक्ति**—अगबाई–बाई बाई ! काय तरी आतां तिकडे एक विलक्षण चमत्कार झाला, पहा !

**विशालाक्षि**—आधींच चमत्कार, आन् तो अतिशयोक्तीनं सांगितलेला ऐकायचा; मग ऐकायला तरी विलक्षण असेल खरा !

**रूपक्या**—पण मूळच्या गोड पदार्थांत आणखी साखर मिसळल्यानं जशी त्याची रुचि वाईटच होते तसं तर अतिशयोक्तीनं सांगितल्यामुळें त्या चमत्काराचं होणार नाहीं ना ?

**अतिशयोक्ति**--पण कोणताही चमत्कार म्हटला म्हंजे तो अतिशयोक्तीनंच सांगितलेला ऐकण्यांत खरी खरी मौज असते. तेंच रूपकानं सांगितलेला ऐकतांना ऐकणाराच्या उत्सुकतेचा पदोपदीं विरस मात्र होतो.

**केशरंजनी**--अगदीं ठीक बोललीस. बरं पण सांगतेसना तिकडे काय असा विलक्षण चमत्कार झालाय तो ?

**रूपक्या**--हो, सांग सांग, काय ढगावांचून पाऊस पडला, कां विस्तवावांचून कुणाचं आंग पोळलं, किंवा एखादी मजेदार गंमत पाहत असतांहि कौतुक वाटण्याऐवजीं कोणाला रडूंच कोसळलं--

**अतिशयोक्ति**--अगदीं अस्संच सारं झालं आहे. पण नीट ऐकून घेतलं तर समजेल तें.

**रूपक्या**--बरं तर बोल.

**अतिशयोक्ति**--हें पहा, नुकतेच आपले महाराज स्नानाकरितां स्फटिकशीलामय जलमंदिरांत येऊन मधल्या चौकांतील रत्नजडित रुप्याच्या चौरंगावर बसले. बाराशें राजस्त्रिया आणि सोळाशें नाटकशाळा त्या ठिकाणीं जलक्रीडेसाठीं हळु हळु त्यांच्या भोंवतीं जमूं लागल्या. महाराज कोणाकडे प्रेमानं नुसतंच पाहताहेत तर कोणाशीं बोलताहेत, कोणाशीं विनोद करून हंसताहेत तर कोणाला रुसवताहेत, कोणाला कांहीं देताहेत तर कोणाची नुसतीच कांहीं चेष्टा करताहेत, कोणी त्यांच्या आंगावरला दरबारी पोषाख उतरून घेताहेत तर कोणी मणीरत्नभूषणं काढताहेत, कोणी उपवस्त्र नेसायला पुढें करताहेत तर कोणी पंख्यानं त्यांना वारा घालताहेत. असा सारे थाट चालला होता. इतक्यांत वरल्या सज्जांतनं महाराजांच्या उघड्या आंगावर उष्णोदकाचे आपले टपाटप हे थेंब पडूं लागले ! जशी कांहीं मुसळधारच धरली आहे वरतून कोणी !--

**केशरंजनी**--( उपहासानें ) मुसळधार !

**अतिशयोक्ति**--ऐकून तर घ्या; जाईच्या पुष्पासारखं महाराजांचं नाजुक कोमलशरीर, असे थेंब पडूं लागतांच हा एकेक तांब्याएवढा फोड तरीरून त्यांच्या आंगावर उठला !--

**विशालाक्षि**--तांब्या एवढा !

**रूपक्या**--घागरी एवढा म्हणाली नाहीं हें भाग्य !

**अतिशयोक्ति**--पुनः तेंच. ऐका आधीं; एकाएकीं हें काय झालं म्हणून सगळींजणं वरतीं पहातात, तों आपल्या थोरल्या मासाहेब, महाराणी मैनावती, ह्या वरल्या सज्जांत बसल्या असून त्यांच्याच नेत्रावाटें चाललेला तो अश्रूंचा लोट.--

**रूपक्या**--नव्हे, धवधबा असेल !

**अतिशयोक्ति**--महाराजांच्या अंगावर पडतो आहे असं दिसलं ! तेव्हां महाराज तर लागलींच तिथनं उठून सज्जावर मासाहेबांकडे गेले आणि हा काय बाई प्रकार असावा, अशा आनंदकारक सुंदर देखाव्यानं मासाहेबांना तें इतकं वाईट कां वाटावं, याबद्दल आपसामध्यें आश्चर्य करीत आतां सगळ्या स्त्रिया जलमंदिरांतच बसल्या आहेत !

**विशालाक्षि**--कां केशरंजनी, मघां म्हणालीसना, कीं विरक्तवृत्तीचीं उदास माणसं महाराजांच्या जलक्रीडेच्या ठिकाणीं असणार आहेत कोण ? पण त्या जोगड्यानं मासाहेबांवर जातां जातां आपला पक्का वरदहस्त ठेवून दिला आहे.

**अतिशयोक्ति**--अथवा मेला चांगला हातच फिरवून गेला आहे असं कां म्हणानात !

**विशालाक्षि**--तो एकाएकीं कुठं नाहींसा झाल्यापासनं मासाहेब अशा नेहमीं दुःखी कष्टी असतात. दुखऱ्या डोळ्यांना तीव्र प्रकाश सहन न व्हावा त्या प्रमाणं महाराजांचं ऐश्वर्य जें त्यांना पहावेनासं झालं तें त्यामुळंच असेल.--

( चाल--क्या सुहावे रंगेजोमोरारंग. )

**झुरति सदा मनिं जेंवि विरहिणी ॥ झुर० ॥ भोग अशनशयनादि विवर्जुनि ॥ मग्न सदा त्या प्रियजनचिंतनिं ॥ झुर० ॥ विषयपराङ्मुख योगरतांचा ॥ डौल दिसे मग सहज बाह्यपणिं ॥ झुर० ॥**

**रूपक्या**--( एकीडे ) अरेरे ! जशा सीताद्रौपदी तशा शुद्ध आणि यशोदा कुंती तशा सगळ्यांशीं प्रेमळ, या आमच्या मासाहेबांविषयीं यांचं काय हें अभद्र भाषण ! आमच्या सारख्या मूर्खांना जसं शहाण्या माणसांचं शब्दयोजनाचातुर्य समजत नाहीं, तशी विरक्त अंतःकरणाची पवित्र गुरुनिष्ठा या विषयवेल्हाळ्यांना काय समजणार आहे !

**अतिशयोक्ती**—रात्रींच्या रात्री मासाहेब त्या वेळीं पाहाव्यात तों गांवाबाहेर त्या जोगड्याच्या मठींत ! मोठ्ठे मेले दुष्ट असतात हे जोगडे ! कांहीं तरी नाटक चेटक कुयाड करून बायाबापड्यांना भुलीवतात, आन् त्या आपल्या चांगल्या नादीं लागल्या, म्हंजे मग कुणाला कुत्री नाहींतर मैना करून बरोबर घेऊन जातात !

**रूपक्या**—केवळ कुतर्क, आन् त्यांत ते अतिशयोक्तीचे !

**अतिशयोक्ती**—हीं, हीं, आमची स्वारीसुद्धां लागलीच होती कीं त्या मेल्याच्या नादीं. कायग वाई. त्या वेळीं जेव्हां केव्हां घरांत कांहीं झालें, कीं " मी होतों जोगी " म्हणून मला आपलं भय घालायचं. रात्रंदिवस मला काळजी वाटे, अगदीं झुरणींस लागलें होत्यें. हो करायचं काय ? विक्षिप्तपणानं गेले असते एखादे दिवशीं आंगाला राख फांसून तर ? मला अगदीं भिऊन वागावं लागत असे. अन्नपाणी सुद्धां गोड लागत नव्हतं, त्या काळजीनं त्या वेळीं मी इतकी कांहीं वाळून गेल्यें होत्यें, कीं आतां आहे ही कांहींच नव्हे !

**केशरंजनी**—म्हंजे, आतां ही आपल्याला वाळलेलीच समजते आहे बरं का ?

**रूपक्या**—पण जसं मृगजळांतलं पाणी, खेळांतली राजाराणी, आकाशफुलांची गुंफलेली वेणी, कासवीच्या दुधाचं लोणी, तशीच अतिशयोक्तीची वाणी, खरी मानीतच नाहींत कोणी !

**अतिशयोक्ती**—आन् रूपकांत तरी सर्वांशानं खरेपणा कोठें असतो. तीं पण मतलबापुरतीं एकदेशीयच असतात !

**विशालाक्षी**—ठीक जमलं आहे ! नेहमीं ' जस्सं आन् तस्सं ' या शिवाय यांचं भाषण नाहीं; त्याप्रमाणं याला बायकोसुद्धां जशास तशीच मिळाली आहे !

**केशरंजनी**—बरं पण कायग, अझूनी आहेच का तें जोग घेण्याचं याचं भय तुझ्या मागं ?

**अतिशयोक्ती**—छे ! तें केव्हांच संपलं. आन् कसं पण अगदीं सहज. ( रूपक्याकडे पाहून हंसत. ) कां, सांगूंच कां आतां ?

**रूपक्या**—( तिरस्कारानें ) हं हं, सांगा सांगा !

**अतिशयोक्ती**--हें पहा, नेहमीं नेहमीं जेव्हां, " मी जोग घेतों " असा एकसारखा त्रास व्हायचा, तेव्हां शेवटीं एके दिवशीं मीही रागावून व खूप आदळआपट करून म्हटलं, " काय, घेतांना जोग. हं उठा, घ्या कसा, काढा ते अंगावरले सर्व कपडे, फांसा आंगाला राख, लावा लंगोटी, ही झोळी, हा भिक्षेचा कटोरा. चला ! " झालं, इतकं, मी म्हटलं मात्र आन् संपलं सारं अवसान ! जोग घेतों हें म्हणणं जितकं सोपं होतं तितकं सर्व ते जोग घेण्याचं भिकार साहित्य प्रत्यक्ष पुढें पाहिल्यावर निश्चयानं पत्करणं थोडंच सोपं आहे. " बरं बरं, घेईन मी आपला जोग मला वाटेल तेव्हां. तूं कशाला माझी एवढी तयारी करून ठेवायला पाहिजेस. " अशी तेवढ्यापुरती कांहीं तरी कांघावखोरपणानं संपादणी करून, त्या वेळेपासनं पुनश्च म्हणून जोग घेण्याचं आत्तांपर्यंत नांव नाहीं !

**केशरंजनी**--भलीपण खोड मोडलीस ! तुला झोळी कटोरा हें साहित्य तरी बरं सांपडलंग वेळेवर.

**अतिशयोक्ति**--तो जोगडा जालंधरनाथ, त्या दिवशीं आपल्या वाड्यांतनं एकाएकीं नाहींसा झाला तुम्हाला माहित आहेच; त्या वेळीं त्याचं होतंच तें सर्व वाड्यांत पडलेलं. इकडची एखादवेळ अशी खोड मोडण्याकरितां मुद्दामच मी तें सर्व घरीं आणून ठेवलं होतं !

**विशालाक्षी**--असो पण, पुरे गडे. चला आपण जाऊं या सर्व तिकडे; म्हंजे काय प्रकार आहे तो प्रत्यक्ष समजेल आपल्याला.

**केशरंज०**--खरंच-

( चाल--न बोलो तारा तारा. )

**चला सखि अतां ॥ पुरे या कथा ॥ क्षण इथें वृथा ॥ न उभि राहतां ॥ बघूं या स्वतां ॥ च० ॥ श्रवणीं नयनीं अंतर गणुनी ॥ प्रमाण कुणी ॥ न कधीं हि गणी ॥ वचना श्रुता ॥ च० ॥**

( सगळ्याजणीं पूर्ववत निघून जातात. )

---

## प्रवेश ३ रा.

( स्थळ–जलमंदिरांतील वरचा सज्जा.–पात्रें, मैनावती. सचिंत मुद्रेनें विचार करीत कठड्याशीं उभी आहे. )

**मैनावती**—( उसासा सोडून ) केवळ नाशवंत अशा या शरीराची काय तरी ही प्रतिष्ठा मनुष्य आपल्याकडून ठेवीत असतो पहा,—

( चाल—पाहूनी मुखचंद्र तो. )

**भूषिती शरीरास या ॥ रुचिरांवरें बहु भूषणें ॥ माखिती**
**किति त्यापरी ॥ सुरभीकृतें मृदुलेपनें ॥ शुश्रुषा अशिही**
**जरी ॥ करिती परोपरीनें पहा ॥ शेवटीं परि एकदां ॥**
**पडणार कालमुखीं अहा ॥ भू० ॥**

—पण अज्ञान म्हणतात तें हें. यांतच जीवाची विटंबना चालली आहे !—( गोपीचंद येतो ) ये बेटा गोपीचंद, बैस.

( दोघे बसतात. )

**गोपीचंद**—मासाहेब, आपण आज एकाएकीं इतक्या अशा कष्टी कां झालां अहांत बरं ?—

( चाल—नाहीं कोणींही हुंगीलें. )

**काय कोणीं अवमानीलें ॥ कोण दुर्वच अथवा वदलें ॥**
**कोणि कांहीं अप्रिय केलें ॥ काय झालें तें मज सांगा ॥**
**खिन्नतेनें मुख का सुकलें ॥ अश्रुंनीं कां नेत्रहि भरले ॥**
**काय कारण मन कळवळलें ॥ कोणि छळिलें किंवा सांगा॥**

**मैनावती**—अरे बेटा, तूं म्हणतोस यापैकीं एकहि कारण झालं नाहीं. आणि तें होईल तरी कसं ? असं पहा.—

( चाल—चंद्रकांत राजाची राणी. )

**पति माझा त्रैलोक्यनाथ जो त्रैलोक्यदिनमणी ॥ पुत्र**
**तयाचा नृपश्रेष्ठ तूं तुझीच मी जननी ॥ नृपति विक्रमादित्य-**
**भर्तृहरि उदारचरितमणी ॥ पुण्यकुलीं त्या जन्म असे मम**
**मी तत्प्रिय भगिनी ॥ अशा वैभवीं उणें काय मज दुणें**

**सौख्य भोगी ॥ दुरुत्तरें अवगणिल असाही समर्थ नाहिं जगीं ॥**

**गोपीचंद**—मग मासाहेब, ही आपली दुःखी मुद्रा कां बरं ? आपण एखादा कांहीं हेतु मनांत धरला असेल तर त्याची आज्ञा व्हावी. तत्काल तो पूर्ण करायलाही हा आपला आज्ञाधारक पुत्र तयारच आहे.—

( चाल–रामकरीं जरि नृपपद गेलें. )

**सांगा दुर्मिळ वस्तु हवीशी ॥ करुं सांगा कितिही दुष्करशी ॥ दुर्गम स्थल क्रमावयासी ॥ आज्ञा द्या मजला ॥ करीन मज अप्रियही प्रेमें ॥ दुर्घटही घडवीनाचि नेमें ॥ मानिन मी आनंद क्षेमें ॥ तुमच्या मात्र जगीं ॥**

**मैनावती**—अरे पण एवढा अटहास करून ज्याचं निवारण केलं पाहिजे असं कांहीं मोठं दुःखही मला नाहीं !

**गोपीचंद**—पण किंचित् तरी आपल्याला दुःखस्थितींत असूं द्यावं, हाहि माझा पुत्रधर्म होणार नाहीं. मी तर समजतों कीं—

( चाल–तेंडरेकारनुमेंडरे यारुवा. )

**स्वकुल करित तनय धन्य तो ॥ तो ॥ सुखवित नित जननितात ॥ स्वकु० ॥ न तरी जठरीं शिणलीं वृथा तीं ॥ धरुनि असा मल ॥ स्वकु० ॥ मिरवी विभवीं स्वतनु पितर परि ॥ शिणवि महा खल ॥ स्व० ॥**

**मैनावती**—बेटा तुझी ही मातृनिष्ठा खरोखरच प्रशंसनीय आहे. या निष्ठेंत कांहीं उणेपणा माझ्या प्रत्ययाला आल्यामुळं मी आज अशी कष्टी आहें असं नव्हे. तूं माझ्याशीं नेहमीं उत्तम पुत्रधर्मानंच वागत आहेस, पहा—

( चाल–तुमच्या प्रीतिसी पहा. )

**नाहीं होउनी कुधी ॥ केली अवज्ञा कधीं ॥ ना० ॥ अनुकूल जशी प्रतिमेप्रती राहतसे छाया ॥ वृत्ति तशी तव माझिया ॥ इच्छाधीन सुधी ॥ होउनी कुधी० ॥**

**गोपीचंद**—मग आपल्या या खेदाचं कारण काय असावं बरं ?

**मैनावती**—बेटा, माझ्या या खेदाचं कारण वेगळंच आहे. तुझी वृत्ति विषयोन्मुख आहे. तें तुझ्या लक्षांत आपोआप येणार नाहीं. अरे—

( चाल—नजर जहर मारारे. )

**स्मरूनि कांहि गतकथा ॥ हृदय पावलें व्यथा ॥ स्म० ॥ सहज अनावृतपणें । तप्त अशा स्वर्णगुणें ॥ दिसलि तव तनु क्षणेक भासवि तव गत पिता ॥ स्म० ॥ रूपगुणैश्वर्य तेंहि ॥ कालमुखीं कवल होइ ॥ तींच तव पुढें गतीहि ॥ म्हणुनि येइ खिन्नता ॥ स्म० ॥**

**गोपीचंद**—अहो पण मासाहेब—

( चाल—धेनुमुखीं हा व्याघ्रचि. )

**इच्छामरणी तेही गेले महासाधनीं नुरले ॥ चुरले दंष्ट्रे कराल कालें कवलप्रायचि केले ॥ अपुली काय कथा तेथें ॥ करणें व्यर्थ हाय असतें ॥**

—मी म्हणतों कीं, अशा प्रकारचे उदास विचार मनांत आणून खेद करणंच व्यर्थ आहे. अहो, उत्पन्न झालं तें नष्ट व्हायचं, आणि जरी नष्ट झालं तरी तें पण पुन्हा उत्पन्न व्हायचं हा अबाधित सृष्टिक्रम आहे. हा टाळतां येणं आजपर्यंत जगामध्यें कुणालाच शक्य झालं नाहीं. लौकर म्हणा, उशीरां म्हणा, ज्याला त्याला आपापल्या कर्मानुसार शेवटीं निमूटपणानं याला अनुसरावं लागलंच आहे. अहो—

( तुझी अन्यथा ती कराया कृति, या चालीवर. )

**रवीचा जसा नित्य उदयास्त होई ॥ दिनान्तीं निरवकाश येते निशाही ॥ अतिव्याप्त विश्वास आकाश जैसें ॥ अनुल्लंघ्य हे जन्ममृत्यूहि तैसे ॥ रवी० ॥**

—असल्या विचारानं मनाला निष्कारण उदासीनपणा येऊन जीं कांहीं परिमित तरी सुखं आपल्या वांट्याला सहज आलेलीं असतात त्यांच्या मात्र उपभोगाला मनुष्य साफ अंतरतो.

**मैनावती**—बेटा, हीच समजूत मोठी भ्रममूलक आहेरे. जीं परिमित सुखं तूं म्हणतोस तीं खरीं सुखं नसून केवळ सुखाभास आहेत. पाण्यांत पडून गटं-

गळ्या खात असलेला मनुष्य त्या गटंगळ्यांत वरतीं येतो तेवढ्या वेळांत, जें त्याला बरं वाटतं, तितकंच हें क्षणिक सुख आहे. अशाला कंवटाळीत बसल्यानंच बाबा मनुष्याच्या शाश्वत सुखांत अंतर पडत असतं. प्राणिमात्राच्या मागं निरंतरचा लागलेला हा जन्ममृत्युप्रवाह आहे हें खरं; पण त्यांतनंहि त्याला सोडविणारं प्रबळ साधन नाहीं असं नाहीं. आणि तशा प्रकारचं साधन म्हटलं म्हणजे केवळ समर्थ अशी श्रीसद्गुरुकृपाच होय. गुरुकृपेचा महिमा बेटा तुला काय सांगूं.

( तरुविधुसी पवन योगें० " या चालीवर. )

**जणुं गंगातोय आहे भक्तमलापह अशी ॥ संतप्ता त्रिविध तापें शांत करी शशि जशी ॥ भवपीडाजन्य दैन्या हारक जी सुरतरु ॥ अशि आहे थोर लोकीं करिति कृपा जी गुरु ॥**

—काय सांगावं बेटा, आपल्या पुण्याईनं अशा एका सत्पुरुषाचा लाभ अनायासं आपल्याला नुकताच झाला होता; पण दुर्दैवानं शेवटीं काय म्हणताततना, तशांतलीच गत झाली. पुनः सद्गुरुदर्शनाचा लाभ या प्रारब्धीं असेल काय !—

( अंजनी गीत. )

**लाभ गुरूचा सहजाचि झाला ॥ जणुं अमृताचा मेघाचि वळला ॥ मधेंचि दुर्दैवानिल आला ॥ नेला विस्तळोनी ॥ अवचित अंधा निधान लाधे ॥ कीं मतिमंदा कविता साधे ॥ वंचक कोणी उगवुनि मध्यें ॥ ठकवी दोघांला ॥**

( पडद्यांत 'अहलख' शब्द ऐकूं येतो. )

—अगबाई, कोणाचा बरं शब्द हा !

( रूपक्या गडबडीनें येतो. )

**रूपक्या**—महाराज, महाराज; अहो मासाहेब, हें पहा तेजानं जसा गभस्ती, आणि चर्येनं म्हणाल तर दुर्वास, विश्वामित्र किंवा समुद्र शोषण करूं निघालेला अगस्ती, असा कोणी एक जोगी बाहेर आला आहे. गुरु जालंधरनाथाचा आपण शिष्य अहों असं सांगतो.

**मैनावती**—( आनंदानें ) अगबाई ! तर मग तो माझा गुरुबंधुच म्हणायचा; त्या रात्रीं गुरु जालंधरनाथ हे एकाएकीं इथं अदृश्य होऊन कुठं गेले आहेत हें आतां सहज समजेल आपल्याला ! चल गोपीचंद चल. आपण त्याला सामोरं जाऊन मोठ्या सन्मानान आंत घेऊन येऊं.

**गोपीचंद**—ठीक आहे.—चलावं.

( मैनावती लगबगीनें जाते. गोपीचंद थांबून रूपक्यास विचारतो. )

**गोपीचंद**—कायरे, त्या आलेल्या जोग्याची मुद्रा फार रागीट आहे असं तुझ्या सांगण्यावरनं दिसतं.

**रूपक्या**—मुद्राच काय, पण वाणीहि तशीच. वीज जशी कडाडते तसा संतापून एकेक शब्द तो बोलतो आहे.

**गोपीचंद**—त्यानं आपल्या गुरूविषयीं कांहीं विचारपूस केली कीं काय !

**रूपक्या**—गुरूविषयीं नाहीं; पण आपल्या गुरूची ज्यानं मोठी विटंबना केली आहे तो दुर्बुद्धि कुठं आहे, मला दाखवा, असं मात्र वाघाप्रमाणं ओरडून म्हणाला !

**गोपीचंद**—तर मग त्याच्या गुरूची काय अवस्था झाली आहे हें त्याला माहीत असावंसं दिसतं.

**रूपक्या**—महाराज, तो म्हणाला तितकं सर्व मला आपल्यापुढें जर स्पष्ट बोलून दाखवायला येतं तर आपण इतक्या स्वस्थ मनानं त्याची विचारपूस रीत इथं उभें राहिलाच नसतां. हिंवानं जसं कांपरं भरावं, तसं आपलं सर्वांग कांपूं लागलं असतं; उन्हानं जसं तोंड सुकून जावं, तशी आपली मुद्रा झाली असती; आणि पावसानं शरीर नखशिखान्त भिजावं तसं घामानं दर्दरून आपण न्हालेले दिसलां असतां !

**गोपीचंद**—( आपल्याशीं ) प्रसंग मोठा कठीण आलेला दिसतो.—

( चाल— धाडुनी दिधलें दासीसह मी. )

**पेरियलेलें दुर्बुद्धीचें बीज दिसे हें अंकुरलें ॥ विस्तृत त्याचा तरु होउनियां कटुतर आतां धरिल फलें ॥ गूढ असो तें**

**दुष्कृत कितिही प्रकटचि होत असे कालें ॥ परि परिणामीं दुःखद असतें आनंदावह जरि पहिलें ॥**

( पोषाख घेऊन अतिशयोक्ति येते. )

**अतिशयोक्ती**—महाराज, आपल्यासाठीं मासाहेब बाहेर खोळंबल्या आहेत.

**गोपीचंद**—( पोषाख घेऊन ) चल तूं. आलोंच.

( अतिशयोक्ति जाते. )

**गोपीचंद**—( आपल्याशीं ) खरं म्हटलं तर मला त्या जोग्याचं भय मुळींच वाटत नाहीं. जगांतल्या सर्व असल्या जोग्यांचा क्रोधाग्नि या वेळीं एकवटून मजवर त्याचा वर्षाव झाला तरी तो मी आनंदानं पत्करीन. पण त्या-दिवशीं मीं एकदम अविचारानं जालंधरनाथांचा जो शेवट केला तो आतां मासाहेबांना समजल्यावर त्यांच्या कोमल आणि शुद्ध गुरुनिष्ठ अंतःकरणाला भयंकर धक्का बसेल त्याचं मला भय वाटतं ! मजवर त्यांचं किती प्रेम; मीहि आत्तां पुत्रधर्माच्या केवढाल्या एकेक गोष्टी त्यांना सांगितल्या. त्या माझीच त्यांच्याशीं अशी वंचकवृत्ति ! आणि तीहि केवळ इतरांच्या सांगण्यावरनं जालंधर-नाथांच्या संबंधानं मासाहेबांविषयीं भलताच एक संशय मनांत आणून ! धिःकार असो माझ्या त्या क्षुद्रबुद्धीला ! कोणत्या मुखानं मीं आतां त्यांच्या पुढं जाऊं; कशा दृष्टीनं मी आतां त्यांच्याकडे पाहूं; प्रतारणा तरी आतां त्यांच्याशीं काय काय करूं ?—छेः या कल्पनांनीं मला खचित भ्रम होईल.—पण अशा स्थितींत मला आतां धैर्य देणारी काय ती एकच गोष्ट आहे. आणि ती हीच कीं,—

( चाल—प्रियेविण मजला चैन पडेना. )

**रक्षिल जननी मज या कालीं ॥ दोष सहस्रहि उदरीं घाली ॥ र० ॥ बहु ऐकियलें सुत आजवरीं ॥ दोष विराचेते कुमति मजपरी ॥ परि न कुमाता एकहि झाली ॥ र० ॥**

( जातो )

**रूपक्या**—अरेरे ! महाराजांनीं काय बरं केलं हें ! जसा सर्पाच्या शेपटी-वर पाय द्यावा; निद्रिस्थ सिंहाला डवचावा; तसा या कर्तुमकर्तुमन्यथाकर्तुम

समर्थ अशा जोग्याचा क्रोधाग्नि यांनीं एक निष्कारण महदपराध करून खवळविला आहे. आतांपर्यंत ही वार्ता इथं कुणालाच माहीत नव्हती. आम्ही सारे समजत होतों कीं, जालंधरनाथ हे आपल्या सहज योगलीलेनं इथं एकाएकीं अदृश्य होऊन कुठं तरी गेले असतील. पण जसं देवांचं तीर्थ आणून तें एखाद्या मोरींत टाकून द्यावं, तसं गुरु जालंधरनाथांना महाराजांनीं मुद्दाम मोठ्या सन्मानानं वाड्यांत आणून रात्रीं ते समाधिस्थ असतां गुप्तपणानं त्यांना घोड्याच्या लिदीचे खाईत पुरून टाकलं! शिवशिव; दूध पितांना मांजर जसं तें डोळे झांकूनच पीत असतं, तसं महाराजांनीं आपल्या मनानं ही गोष्ट अतिशय गुप्त म्हणून केली खरी; पण ती या अतींद्रियद्रष्ट्या सिद्ध पुरुषांपुढं चोरून कशी राहणार! शमीक ऋषि ध्यानस्थ असतां मृत सर्प गळ्यांत घालून त्याची चेष्टा परीक्षिति राजानं केली, व तिचा परिणाम त्याला अल्पअवधींत मृत्युवश व्हावं लागलं असा झाला. ही गोष्ट आठवली म्हणजे, आतां याहि चेष्टेचा परिणाम काय भयंकर होईल याची कांहींच कल्पना करवत नाहीं! जसं ग्रीष्म ऋतूंतल्या प्रखर उन्हांत तसंच त्या जोग्याच्या सक्रोध दृष्टीपुढं आपल्याला तर बोवा क्षणभरसुद्धां उभं राहण्याचं धैर्य होईना. ( पडद्याकडे पाहून ) पण बरं झालं हं. ही पहा, आमची स्वारी तिकडनं येत आहे. आतां इथल्या इथंच समजेल तिकडे काय प्रकार झाला तो. बाकी हिच्याकडनं अशा गोष्टी ऐकायच्या म्हणजे त्या आपल्याला अधिक मात्र भयप्रद करून घ्यायच्या!

( अतिशयोक्ति येते. )

**अतिशयोक्ती**—छे छे छे छे! असला प्रचंड कोपी मनुष्य बाई साऱ्या जन्मांत कधीं पाहिला नाहीं; आन् तो मीच काय पण या जगांत कुण्णी कुण्णी सुद्धां पाहिला नसेल! जमदग्नि म्हणून एक मोठा कोपिष्ठ होऊन गेला असं पुराणांत ऐकल्यें. पण याची कांहीं सर त्याला खचित नसेल. काय तें भाषण, केवढा आवेश, कसली गर्जना, किती आदळ आपट! छेग बाई! आम्ही सगळींजणं अगदीं गर्भगळीत होऊन गेलों; निर्जीव चित्रासारखीं तटस्थ राहिलों! ऐकलंत का; आपल्या मासाहेब जाऊन त्या जोग्याच्या पायां पडल्या त्या वेळीं फक्त तो कांहींसं तिरस्कारानं ‘ कल्याण ’ असं म्हणाला; पण महाराज पुढें झाले त्या वेळीं जो का तो एकदम उसळून, “ चल दूर दूर हो. अधम पापी

चंडाळ दूर हो " असं ओरडून तोंड फिरवल्या फिरवल्याच म्हणाला, अरे तुझ्याकडे दृष्टि फिरवून पाहीन, तर तूं जळून खाक होऊन जाशील. चल दाखीव, गुरु जालंदरनाथांना कोणत्या खाईत पुरून टाकलंयस तें !

**रूपक्या**—एकदम स्पष्टच विचारलं त्यानं हें ! बरं मग ?

**अतिशयोक्ति**—मग काय सांगूं ! आपल्या गुरूची अशी अवस्था आपल्या पुत्रानंच केली, असं ऐकलं मात्र आणि ' हारे कर्मा ' असं म्हणून मासाहेबांनीं धाडकन आंग खालीं टाकलं. इकडे हें पाहून महाराजांच्या आंगाचं पाणी पाणी झालं !—

**रूपक्या**—जसं कांहीं ते या घडलेल्या अपराधाचा मळ धुऊनच टाकीत असावेत !

**अतिशयोक्ती**—त्यांचं सर्वांग थरथरां कापूं लागलं—

**रूपक्या**—जसा कांहीं सर्व दोष झाडून टाकण्याचाच प्रयत्न ते करीत होते !

**अतिशयोक्ती**—निमूटपणें खालीं मान घालून ते त्या जोग्यापुढें उभे राहिले—

**रूपक्या**—धरून आणलेला चोर जसा न्यायाधिशापुढें उभा राहतो तसे !

**अतिशयोक्ती**—त्या वेळीं ते देहभानावर तरी होते का नाहीं याचा संशय वाटतो. आम्ही इतक्या दासदासी तिथं होतों पण आम्हांला त्या वेळीं काय करावं तें सुचेना, किं पुढं होऊन मासाहेबांना किंवा महाराजांना सांवरण्याचा धीर होईना. शेवटीं त्या जोग्यालाच दया येऊन त्यानं स्वतः मासाहेबांना सावध करून उठीवलं. मासाहेबांनीं उठतांच अगोदर महाराजांना हातीं धरून त्याच्या चरणावर घातलं, स्वतां पदर पसरला, आणि आतां आपणच सर्व अपराधांची क्षमा करून या प्रसंगांतनं सर्वांचं कल्याण होईल अशा रीतीनं निभावून न्या अशी परोपरीनं विनवणी केली. शेवटीं बाई त्याला दया येऊन तो एकदांचा शांत झाला !

**रूपक्या**—आणि माझ्यासुद्धां जीवांत जीव आत्तां आला ! वावटळींत सांपडलेला मनुष्य नाकातोंडांत वारा भरूं लागला असतां जशी त्याची त्रेधा उडते, किंवा महापुरांत पडलेला मनुष्य गटंगळ्या खाऊं लागला म्हणजे जसा घाबरतो, तसं तुझ्या या वर्णनाच्या भराऱ्या ऐकून इकडे माझं झालं होतं. पण तिकडे

महाराज जसे निभावले तसा मीहि या प्रसंगांतनं एकदांचा धडपणीं निभावून पार पडलों म्हणायचा !

**अतिशयोक्ती**--आहाहा ! चला ! बरी आपल्याला थट्टा सुचते ! हा प्रसंग-सुद्धां आपल्याला गमतीचाच वाटतोयना ! आमच्या तर बाई अगदीं तोंडचं पाणी पळालं होतं !

**रूपकया**--तिथं असतों तर माझंहि तसंच झालं असतं ! बाकी आतां मात्र त्यांतले त्यांत आनंदच झालाय मला. आन् तो एवढ्या करतांच, कीं " हे जोगडे असेच असतात, हे जोगडे तसेच असतात," म्हणून मघां जें आपलं फार पांडित्य चाललं होतं, तें हें तोंडचं पाणी पळालं त्या बरोबरच, जसं घामानं गंध पुसून जावं, तसं तुझं आतां पार धुऊन गेलं असेल, नाहीं बरं ?

**अतिशयोक्ती**--नाहींगबाई; आतां कधीं नांव काढणार नाहीं या जोग्यांचं ! तिथं होत्यें त्याचवेळीं प्रत्येक क्षणाला असं वाटे कीं, हा आतां मी केलेली निंदा बाहेर काढून माझाहि समाचार घेतोय कीं काय ? केव्हां एकदां तिथनं पाय काढीनसं झालं होतं मला. नको, कानाला खडा लावला अगदीं. ही आपली जीभ चावून घेतली. पुनश्च म्हणून या जोग्याच्या वाटेला जायचं नाहीं.

**रूपकया**--पहा, पहा बरं. त्यानं मला जोगी बनवून; दाव्यानं गुरूं धरून न्यावं, तसं आपल्या बरोबर नेलं तरी सुद्धां हाच निश्चय ना ?

**अतिशयोक्ती**--होय. तरी सुद्धां हाच निश्चय. ( लाडानें ) तसं झालं तर मग मींहि आपल्या बरोबर जोगीण होईन म्हणजे झालं !

**रूपकया**--अरे वः, आजचा काय हा योग ! गवई आणि बजवई यांच्या आवसानांचा अकस्मात जसा समेवर एक मिलाफ व्हावा, तसे तुझे माझे विचार अवचित कसे एक जुळले बघ ! तर मग आतां जसे हे विचार तसेच जेथून हे बाहेर पडले तीं आपलीं तोंडंहि कशीं एकमेकांशीं जुळतात तें पाहूं ये बरं !

( त्याला ती झिडकारून निसटून जाते; तोहि बावळी मुद्रा करून जातो. )

## प्रवेश ४ था.

**स्थळ**—राजवाडा. **पात्रें**, कानिफनाथ आसनावर बसले आहेत,
दोहों अंगास मैनावती व गोपीचंद उभीं आहेत
जवळ दास दासी आहेत.

**मैनावती**—( अर्घ्यपाद्य देऊन पूजा झाल्यावर ) ऐकलंत कानिफनाथ, आतां ग्पक्षीं यश घेणं हें आपल्या हातीं आहे.

( चाल—परिणिलें न मुनिकन्येला. )

**घडुं नये कर्म तें घडलें ॥ सकलांसि सांकडें पडलें ॥ हें किती ॥ पडुं नये भ्रमीं मन पडलें ॥ शेवटीं सहज बापुडलें॥ हें किती ॥ परि अतां शरण सर्वथा होउं नान्यथा अभय जें देघलें ॥ पाहिजे नतावन झालें ॥ गुरुकृपें ॥**

**गोपीचंद**—सांई महाराज, या दासाची सुद्धां या चरणांपाशीं हीच प्रार्थना . या वेळीं माझी स्थिति म्हणाल तर केवळ अशी झाली आहे.

( चाल—चिद्धनैक ज्ञान मंगला, माणिक. )

**दुरभिमान सर्व हरपला ॥ अनुतापें तापुनि आविचार कर-पला ॥ दुर्बुध्यंकुराहि खुरपला ॥ गुरुविरोधऱ्हद हृदयांतूनि झरपला ॥ मन उदास धरी त्रास विटुनी सविभवभवास॥ गुरुचरणीं एकभाव हा समर्पिला ॥ अ० ॥**

**कानिफनाथ**—बच्चा, ऐसा हुवा होय तो अच्छा है. पर मनुष्यके हाथसे के अबिचार वैसा अनुतापभि शीघ्र हो सकता है. अविचारके फल जो : और दुःख हैं वो प्राप्त हुवे के अनुतापभि उसके पीछे झटपट खडा होता पर ऐसा अनुताप अंतः करनमें बिना स्थिर रहे उसकी कुछ प्रतिष्ठा नहीं.

**मैनावती**—खरं म्हटलंत आपण हें. बरं पण कानिफनाथ, आतां गुरुना-त्या अमंगल खाईतनं बाहेर काढण्याची कशी काय तजवीज करायची त्याची : व्हावी.

परमात्माका साक्षात्काररूप अमृतपान कर रहें हैं. साक्षात् जग्यकुंडमेसें उनका जनन है इसवास्ते उनके तनको पीडा दे ऐसा सामर्थ्य इस सृष्टीके किसी तत्वमे नही है. अब थोडेहि दीनोंमे गुरुमहाराजकी जोग्यता समानही मछंदरनाथ हमारे दूसरे गुरु हैं वो यहां आनेवाले है उनकी कृपा और सहायतासे सब कुछ अच्छा होगा.

**मैनावती**—बरं आहे. त्यांचाहि अनुग्रह करिवणं- आपल्याच हातीं आहे. तोंपर्यंत आपण आतां आमच्या वाड्यांत रहावं अशी आमची इच्छा आहे.

**कानिफनाथ**—नही माई. जिस खाईमें हमारे गुरुनाथ आपने समाधि-सुखमे तल्लीन हैं उसीके पास अब मेरा मुक्काम होगा.

**मैनावती**—जशी आपली मर्जी.

**कानिफनाथ**—चलो अब उसी खाईके पास जाकर गुरुनाथका दर्शन लेवें. ( उठतात. )

**मैनावती**—चलावं. कोणीकडून तरी चार दिवस आम्हांला आपली सेवा व्हावी. म्हंजे त्या सेवेच्या पुण्याइनं जालंधरनाथ आणि मछिंद्रनाथ यांच्या सारख्या परमसिद्ध महात्म्यांचं दर्शन व त्यांचा अनुग्रह होण्याची पात्रता आमच्या ठिकाणीं येईल.

**गोपीचंद**—खरं आहे–

( सवाई दिंडी. )

**विसरवी तो परमार्थमार्ग सारा ॥ भवपसारा॥ सौख्य सर्व-**
**स्वचि करवि सदन-दारा-॥ धन-कुमारा ॥ परी कांहीं सत्सं-**
**गलाभ होतां ॥ मूढ चित्ता॥ कळूं लागे अध्यात्मपर सुवार्ता॥**
**या भवार्ता ॥**

**कानिफनाथ**—अहलक ! ( पडदा पडतो. )

( अंक पहिला समाप्त. )

# दुसऱ्या अंकांतील पात्रें व देखावे.

**गोरखनाथ**—मछिंद्रनाथाचा शिष्य.
**वारांगना**—एक कर्णाटकी वेश्या.
**सखी**—वारांगनेची दासी.
**साजिंदा**—वारांगनेचा परिचारक.
**चौकीदार**—मल्याळ देशचे सरहद्दीवर प्रवाशांचे तपासणीसाठीं नेमलेला अधिकारी.
**चाकर**—चौकीवरील शिपाई.
**आय्या**—कर्णाटकी ब्राह्मण.
**बाई**—भाजीपाला विकणारी स्त्री.
**परिमळा**—मल्याळ देशांतील स्त्रीराज्याची मुख्य राणी.
**मछिंद्रनाथ**—गोरखाचे गुरु.
**मैनीनाथ**—मछिंद्रनाथापासून परिमळा राणीस झालेला पुत्र.
**चंद्रकला**—
**चंपककली**— } परिमळेच्या दरबारी स्त्रिया.
**सुवर्णमालती**—

---

**१ देखावा मारुतीचें देवालय**—(प्रवेश पहिला.)
**२ " परिमळेचा दरबार**—(प्रवेश दुसरा).
**३ " बागेचा**—प्रथम दिसून नंतर एकदम चहुंकडे हजारों मैनीनाथ दिसूं लागतात व पुनः पूर्ववत् बाग होते. (प्रवेश तिसरा.)

---

# अंक दुसरा.

( मल्याळ देशच्या सरहद्दीवरील श्रीहनुमानजीचें देवालय. अनेक यात्रेकरू स्त्रीपुरुष मिळून आरती चालली आहे. )

( चाल—आरतीची. )

**जय जय जय बजरंग ॥ चोरुनि अहीमहीनें रघुनाथा नेलें ॥ जैं रघु० ॥ निज असुरी मायेनें मोहुनि ठेवियलें ॥ जय ० ॥ रक्षित दक्षपणें जरि होती कपिसेना ॥ जरि० ॥ असतां सुप्तचि नेलें गुप्तपणें त्यांना ॥ जय० ॥ जासी धांवुनियां तैं पाताळींहि बळी ॥ तूं पा० ॥ आणिलें सोडुनि वंचुनि असुरें सर्व खुळीं ॥ जय० ॥ जिंकावें कपट्यांना कापट्येंच खरें ॥ तें का० ॥ होतो न्याय बरोबर म्हणती बुधहि बरें ॥ जय० ॥ असुनि विरक्त महा तूं रक्त प्रभुचरणीं ॥ अनुरक्त प्र० ॥ भक्तशिरोमणि त्याचा जो शिवकंठ-मणी ॥ जय० ॥**

**सर्वजण**—" बोलो बजरंग बलीकी जय !

( प्रदक्षिणा वगैरे करून सर्वजण निघून जातात. )

**गोरख**— ( एकटाच आपल्याशीं ) वाहवा ! यह अर्थभरित पद्य इसबख्त देखो मेरेको कैसा बराबर सूचक हूवा है. हमारे गुरुनाथजी परिमला रानीके प्रेमजालेमें जैसे फंस गये हैं, वैसेहि श्रीरघुनाथजी महिकावतीमें राच्छसी मायासे मोहित होकर बंध गये थे. उनके शुद्धयर्थ रघुनाथके परम भक्त यह हनुमानजी जब अहीमहीके राज्यमें गये थे, तब इनको कुछ रूपांतर करके जाना पडा था; और-महिकावतीमें भी अंगबलसे अधिकतर कपटप्रयोगसे उन दुष्टोंके हाथसे रघुनाथजीको छुडवाकर ले आनेकी जरुरत पडी. मय समजता हूं के अब मेरे-कोभी वैसाही कोई वेषांतर और कुछ कपटप्रयोग करके जाना जरूर पडेगा.

अच्छा, तो चलो. पहेले इस मंदिरमें जाकर अस्तुतीस्तोत्रसे हनुमानजीको प्रसन्न करें. ( जातो. )

---

## प्रवेश दुसरा.

( एक वारांगना, तिची सखी, आणि साजिंदा बोलत येतात. )

**वारांगना**—एक काळजी दूर झाली. तरी मेली दुसरी आहेच.

**साजिंदा**—ती कोणती ?

**वारांगना**—मृदंगी इथल्याइथं मिळाला, पण त्याला आतां मल्याळ देशांत आपल्या बरोबर न्यायचं कसं ही पंचाईत आली.

**साजिंदा**—खरंच; हें माझ्या लक्षांत आलंच नाहीं त्या वेळीं.

**सखी**—माझ्या आलं होतं. कारण पार्वतीच्या शापानं परिमळा राणीच्या राज्यांत कुणाही पुरुषाचा प्रवेश होत नाहीं, हें मला माहीत आहे. तत्राप म्हटलं हा जोगडा आहे. याला इथं मज्जाव होणार नाहीं.

**वारांगना**—होय, कांहीं दिवसांपूर्वी असाच एक जोगडा खुद्द परिमळा राणीच्या नजरबागेपर्यंत गेला होता; पण त्या वेळीं ती त्याजवर मोहीत होऊन तिनं त्याला आपल्या अंतर्महालांत ठेवून घेतला. आणि तेव्हां पासूनच अशा जोग्यांना सुद्धां तिनं आपल्या राज्यांत येण्याची वंदी केली असून तसे हुकूम या सरहद्दींवरील चौकीदारांना सोडले आहेत म्हणून ऐकल्यें.

**साजिंदा**—तिला वाटलं असेल कीं, ' यथा राजा तथा प्रजा ' या न्यायानं आपला कित्ता जर राज्यांतल्या प्रत्येक स्त्रीनं उचलला तर त्या ठिकाणचं निव्वळ जें स्त्रीराज्य आहे तें नाहींसं होऊन जिकडेतिकडे जोगी आणि जोगिणी यांचेच मठ दिसूं लागतील !

**वारांगना**—तें कांहीं असो; पण यामुळं आपल्याला मात्र पंचाईत आली. त्यांतनं या ठिकाणचा हा जो चौकीदार आहे त्याची तर राणीचा तो हुकूम अमलांत आणण्याची कमालच आहे म्हणतात. हा मेला कोणाहि पुरुषाला जाऊं देत नाहीं इतकंच नाहीं तर त्याची तब्येत लागल्यास पुरुष जातीचे पशुपक्षी व पुरुषवाचक पदार्थ सुद्धां चौकीवर अडकावून ठेवूं लागतो ! परवां एक या रस्त्यानं

कोणाची मोठी स्वारी गेली. त्या वेळीं यानं तिच्यांतल्या पालख्या गाड्या तेवढ्या जाऊं देऊन रथ व मेणे होते ते काय म्हणे पुरुष नांवाचे म्हणूनच चौकी-वर अडकावून ठेवूं लागला !

**सखी**—मेला माणसांचे हात पाय डोळे काढून घेत नाहीं हें तरी भाग्यच समजलं पाहिजे !

**साजिंदा**—हें पहा कोणत्याही राज्यांतल्या हुकुमाच्या अंमलबजावणीचं हें असेंच असतें. पावसाच्या पाण्याप्रमाणें अगदीं मूळठिकाणचा शुद्धपणा अखेर अखेर गढुळलेला आढळल्यावांचून राहात नाहीं. याला इलाज नसतो हें खरं; पण एखादे वेळीं अर्थाचा अनर्थ होऊन नसता त्रास होतो हेंही खरंच !

**वारांगना**—परिमळा राणीनं कोणत्या हेतूनं तसा तो हुकूम सोडून त्याप्र-माणं प्रवाशांची तपासणी या चौकीवर ठेवली आणि हा मेला चौकीदार आपलं आणखी अति शहाणपण त्यांत मिसळून त्या हुकुमाची बजावणी कशी करतोय पहा ! गतवर्षीं आपण इथं यात्रेला आलों होतों त्या वेळीं या धर्मशाळेची राखण करणारा हा आल्या गेल्या उतारकरूंच्या हातापायां पडून कांहीं मिळवून गुजारा करीत असे. पण हा अधिकार हातीं आल्यापासनं मेल्याला स्वर्ग अगदीं तीन बोटं उरला आहे.

**सखी**—लठ्ठ फुगला आहे तरी किती ? ही अंमलबाजी मेल्याच्या चांग-लीच पचनीं पडलेली दिसते !

**साजिंदा**—हेंच खरं. हुकमाच्या असल्या या विलक्षण तऱ्हेच्या बजावणींत असा जो फाजीलपणा असतो तो खातरीनं कांहीं तरी मतलबाचाच असतो ! मी म्हणतों हा आपला मृदंगीबोवाच तर काय, पण कैक असे आणखीहि कोणी पुरुष याचा हात दाबून खुशाल स्त्रीराज्यांतनं जाऊन येत असतील !

**वारांगना**—बरं पण आम्ही या एक चौकीवरनं याला घेऊन जाऊं कसं-तरी. पण पुढं स्त्रीराज्यांत गेल्यावर आन् खुद्द परिमळा राणीसाहेबांपुढंहि आ-म्हांला हजीरी द्यायची आहे, तेव्हां तिथं या बोवाजीचं कसं करायचं ही पंचा-ईत आहेच.

**साजिंदा**—अं: ! त्याची नको काळजी. नेहमीं सर्वांग एका बुरख्यानं झांकून घेऊन तसं तुमच्या बरोबर असण्याचं त्याला सांगूं म्हणजे झालं. कुणी

विचारलं तर सांगा कीं, दूरच्या एका यवनी देशांतली ही बाई आहे. लग्न झाल्यानंतर एका आपल्या नवऱ्याशिवाय इतर कोणाही मनुष्याला आपलं तोंड दाखवायचं नाहीं, अशी त्यांच्यांत चाल आहे.

**सखी**--ही पहा तीच स्वारी आली इकडे.

( गोरख येतो. )

—कसं काय बोवाजी, तुमचं स्नान देवदर्शन वगैरे सर्व झालं ? येतां ना आतां आमच्याबरोबर ?

**गोरख**—हां माई.

**वारांगना**—चला तर. आतांच इथनं निघण्याचं ठरलं आहे. तुमच्या वाजवण्याच्या करामतींचा मासला दाखविण्याचा प्रसंग कदाचित् इथल्या चौकीदारापुढंच अगोदर येईल.

**गोरख**—कुछ हरजा नहीं. जहां कहे वहां हमारी तयारी है. एक देवकार्यके आगे और कुई कार्य अकार्य हम नहीं जानते. देवकार्यके लिए यह पेशा हमने उठाया है. अब तुम्हारे ताबेदार है. चाहे उधर ले चलिये.

**वारांगना**—चला तर.

**गोरख**--चलो. ' अलख '--

**सखी**—अगबाई, हें काय ? हा आतां तुमचा अलख शब्द हलकेच म्हणत जा. आत्तांपासनं मनांतल्या मनांत म्हणण्याची चांगली संवय करा. नाहींतर चट्कन एखादे वेळीं फजीती होईल.

**गोरख**—हां बराबर. ( हलक्या स्वरानें ) जय गुरुनाथ, जय गुरुनाथ !

( जातात. )

( एका बाजूनें चौकीदार व त्याचा चाकर येतात. )

**चौकीदार**—अवदान्या, अवदान्या.

**चाकर**—जी ?

**चौकीदार**—गाढवाच्या लेका.

**चाकर**—आपण अहांत म्हटलं, मायबाप !

**चौकीदार**—कायरे, गाढवाचा लेक मी का ?

**चाकर**—तसं नव्हे. गाढवाचा लेक मी आन् आपण आमचे मायबाप !

**चौकीदार**—जा; बसायला आण.

**चाकर**—बसायला आणलं.

**चौकीदार**—बसव नीट मला.

**चाकर**—हां, बसावं असं.

( बसवतांना पाडतो. )

**चौकीदार**—कायरे ए गध्या !

**चाकर**—केलं नाहीं मी बुध्यां !

**चौकीदार**—तें काय पाहतो आहेस ?

**चाकर**—म्हटलं ( एकीकडे ) पोट आहेना शाबुत.

**चौकीदार**—बस्स कर फाजीलपणा. चल, टोपी ?

**चाकर**—ही घ्या.

**चौकीदार**—हुक्का ?

**चाकर**—भरून तयार आहे.

**चौकीदार**—इकडे घेऊन ये.

**चाकर**—हा घेऊन आलों.

**चौकीदार**—तें काय पडलंय, उचल.

**चाकर**—उचललं सरकार.

**चौकीदार**—वारा येतोय.

**चाकर**—सांगितलं आहे त्याला.

**चौकीदार**—कोणाला सांगितलंस ! वाऱ्याला ?

**चाकर**—तसं नव्हे; बाहेर गडी बसलाय त्याला सांगितलं कीं, चौकीची खिडकी लावून घे म्हणून !

**चौकीदार**—बरं तिकडे काय गडबड आहे ती !

**चाकर**—हा एक अय्या आहे. आपल्या बायकोला पोंचवायला आला आहे. तो मघांपासनं उगाच घिसघिस करीत बसला आहे. सामान नीट तपासून त्यांतलं आपण सांगून ठेवलंय त्याप्रमाणं पुरुष नांवाचं एकीकडे आणि स्त्री नांवाचं एकीकडे असं काढूं देत नाहीं.

**चौकीदार**—घेऊन ये बरं त्याला इकडं.

( चाकर आय्याला आणतो. )

**आय्या**—स्वामी, आ आमचा टोपी, आमचा दाबळी; शिपाई नेऊं नका मणत्यें. आरकत करत्यें स्वामी. तंगीला तंडी वाजतो, दाबळी टेवला सोंवळा नसतो. कसा करावा, गरिब पडले स्वामी.

**चाकर**—अरे जा. म्हणे, " तंडी होतो आन सोंवळा नसतो. " नसतो तर आमाला काय सांगतो आय्या ? आमचा टोपी, आमचा दाबळी " आमचा " म्हंजे झाला तो पुरुष नांवाचा पदार्थ, तो आम्ही कसा जाऊं द्यावा चौकीवरनं. हुकूमच आम्हांला आहे तसा. हा बघ.

**आय्या**—ओ य्यो य्यो !

**चौकीदार**—( एकीकडे ) अरे वः, आमच्या चाकरानं हुकमाची तामिली करण्याच्या कामीं शहाणपणा दाखवण्यांत ही आमच्यावर सुद्धां कमाल केली म्हणावयाची ! पण या दरिद्री आय्याला अटकावून ठेवण्यांत काय फायदा आहे. हाच असता कोणी चांगलासा श्रीमंत म्हंजे चाकराच्या याहि कल्पनेचा उपयोग या वेळीं चांगला करून घेतला असता.

**आय्या**—स्वामी, आमचा बायको,—

**चाकर**—अरेच्चा, " आमचा बायको कीं, आमची बायको ? "

**आय्या**—स्वामी, गारिब काय मणतो, ऐकावा. आमचा बायको गर्बार राहतो—

**चौकीदार**—वः, मोठंच सांगितलंस हें !

**आय्या**—तसा नव्हे स्वामी; बायको गर्बार असतो, जवळ पुरुष नसतो,—

**चाकर**—( वेडावून ) पुरुष नसतो, बायको गर्बार असतो, हें कसा जुळतो आय्या !

**चौकीदार**—अरे त्याला पुरतं बोलूं दे काय तें. अगर नको. कशाला उगीच कटकट पाहिजे ही. जाऊं दे. आय्या, ही तुमची धाबळी, टोपी घ्या. अरे हे स्त्री नांवाचेच पदार्थ आहेत. जाऊं देत खुशाल हे त्याच्या बायकोबरोबर स्त्री राज्यांत. हरकत करूं नकोस. आय्या जा तुम्ही.

**आय्या**—स्वामी गारीबावर ओपकार झाले. बायका पोरा आशीर्वाद देतो.

**चौकीदार**--बरं, त्या बाईला कां उभी केली आहेस ? काय आहे तिच्या टोपलींत तें ?

( बाई पुढें येते. )

**बाई**--कायबी न्हाई सरकार. निसती भाजी हाये बगा.

**चाकर**—पण त्या भाजींत तो पुरुष नांवाचा नारळ आहे ना ? बस्स, तेवढा काढून ठेवून जा आपली मिर्ची न् कोथिंबीर घेऊन पाहिजे तिकडे विकायला. भोपळा नारळ वगैरे पदार्थ जाऊं देणार नाहीं चौकीवरनं. हा पहा पाहिजे तर हुकूम.

**बाई**--दादा, आमासनीं काय बरं समजतंय त्या हुकमांत. तरीबी इक्तं बरीक समजतंय, किं परिमळाराणीसायबांनीं आपल्या हद्दीमंदी नारळ यिकूं नेऊं द्यायला कांहीं बंदी केली नसल.

**चौकीदार**—हां अस्सं काय ? इतकं समजतंय तुला अं ?. बैस तर आपली समजूत घेऊन आपल्या घरीं. आवदान्या, घे तो नारळ काढून आणि पाटी दे चौकीच्या खालीं फेंकून.

**बाई**--पन तसं कशापायी करताया दादा. नारळ न्येऊं येत नसाल तर मी आपला तो माघुरा घ्येऊनशान जातें कशी.

**चाकर**--तर तर. एकदां आमच्या चौकीवर आलेला जिन्नस आम्ही पुनः परत नेऊं देऊं होय ?

**चौकीदार**--आणि तसं आमच्या हुकमांतहि सांगितलं नाहीं.

**बाई**--आग लावा किं तुमच्या त्या हुकमाला. आमा गरिबांवर जुलूम हाय ह्यो अन् काय !

**चौकीदार**--बस्स बस्स. जास्त बोलण्याचं कारण नाहीं. अवदान्या, चल घे तो नारळ हिस्कावून आन् हकाल देव तिला.

( चाकर त्याप्रमाणें करतो. )

**बाई**—अस गरीब गुरिबाला तरास द्येता, द्येव तुमचं वाटोळं करील मेल्यांनों !

**चाकर**—अग जा. असल्या कामांत मन घालायला देवाला फुरसतच नसते. मोठी आली आहे देवाचं भय घालणार, जा.

( तिला घालवून देतो. )

**चौकीदार**—आज सारीं माणसं असलीं दरिद्रीच कुठून येताहेत कोण जाणं !

**चाकर**—पण हें इकडे पाहिलंत का कोण येताहे तें.

**चौकीदार**—हां, हें टाऊक बरं दिसतंय. आहे, आतां कांहीं लाभ होण्याचा संभव आहे खरा. आजचा दिवस एकून सुना जात नाहीं असं वाटतं.

( वारांगना, तिची सखी व गोरख येतात. )

**सखी** ( मुजरा करून )—राम राम म्हटलं चौकीदारसाहेब, कसं काय, आम्हांला जायला आपली परवानगी मिळेलच ?

**चौकीदार**—कां, तुम्ही कोणी कांहीं आमच्या विहिणी आहांत वाटतं ?

**चाकर**—( एकीकडे ) म्हणे, आम्हाला परवानगी मिळेलच. आन् आम्हीं तपासल्यावांचून ?

**वारांगना**—तर मग तुमच्या विहिणींना तरी तसंच जाऊं दिलं असतंत हें यावरनं उघड ठरतं.

**चाकर**—( एकीकडे ) अरे वः ! बरींच डावपेंचांतलीं माणसं दिसताहेत हीं !

**वारांगना**—मग विहिणीपेक्षांहि जवळचं नातं आम्हीं आपल्याला दाखविलं म्हंजे तर आम्हाला खुशाल जाऊं द्यायला आपली हरकत होणार नाहीं ना ?

**चौकीदार**—हं ? कोण तुम्ही आमच्या ?

**वारांगना**—आम्ही म्हटलं वारांगना आहोंत !

**चाकर**—होय, हें अगदींच जवळचं नातं आहे खरं ! यांना हो कोण हरकत करणार आहे ! कुणाच्या अटकेंत राहण्याची यांना संवयच नाहीं. यांनीं मात्र आजपर्यंत कैकांना कुतरीं मांजरं बनवून जन्माचं आपल्या अटकेंत ठेवलं आहे !

**वारांगना**—मग आतां तर आम्हाला जायला परवानगी आहेना ?

**चौकीदार**—पण हा जोगडा कोण घेतलाहेत बरोबर ?

**सखी**—हा आमचा मृदंगी आहे.

**चौकीदार**—अरे व: ? हे जोगडे आतां आपला परमार्थ मार्ग सोडून नायकिणींच्या मागं तबले वाजवूं लागले का ? चांगला धंदा पत्करला आहे यांनीं. परिमळा राणीसाहेबांच्या महालांत असला एक जोगडा कधीं पासनं घुसलेला आहेच ! त्यावरनं स्त्रीराज्यांत जोग्यांची चैन आहे असं मानून तर ही स्वारी तिकडे चालली नाहीं ना ! तें कांहीं असो. याला तर आम्हाला सोडतांच येणार नाहीं. अशाविषयीं राणीसाहेबांचा अगदीं सक्त हुकूम आहे.

**वारांगना**—हुकूम सक्त असेल; पण तो बजावण्याचं तर आपल्या हातांत आहेना ?

**चौकीदार**—अलबत ?

**वारांगना**—आपण मनांत आणल्यास हे हुकूम आपल्याला अतिशय सक्त करून दाखवितां येतात—

**चौकीदार**—खरं आहे.

**वारांगना**—अगर बिलकूल सैलहि सोडतां येतात.

**चौकीदार**—पण तें सर्व आमच्या मनाच्या खुषी नाखुषीवर अवलंबून आहे.

**वारांगना**—एवढंचना; मग केलं जाईल खुष तुमच्या मनाला.

**सखी**—म्हटलं हा शालु इथं ठेवून जातों तुमच्यापाशीं.

**चौकीदार**—नाहीं तरी हा शालू तसंच म्हटलं तो चंद्रहार हे पुरुषवाचक पदार्थ तुम्हाला या चौकीवरनं नेतां आलेच नसते.

**चाकर**—हुकूमच तसा कडक आहे. आन् आम्ही तर हुकमाचे ताबेदार पडलों !

**वारांगना**—( एकीकडे सखीस )–मेला हुकमाचा तर नव्हे. पण असल्या मौल्यवान रकमांचा मात्र पुरता ताबेदार आहे खरा ! वेसणीनें बैल वळवावा, तसा पहा या जिनसांच्या योगानं कसा पाहिजे तसा खुशाल वळूं लागेल आतां.

**चौकीदार**—( जिनसा घेऊन )–तुम्हांला आतां मात्र परवानगीची बिलकूल गरज नाहीं. जा या जोगड्याला खुशाल घेऊन. पुढं मात्र तो कुणाच्या नजरेला या पुरुषवेषानं न पडूं देण्याची खबरदारी ठेवा म्हणजे झालं. या चौकीइतकी बारीक चौकशी पुढं कुठं नाहीं म्हणा; पण आपलं सांगून ठेवलं.

**सखी**—मग जाऊं आतां आम्ही ?

**चौकीदार**—पण जरा बसाल तर खऱ्या घटकाभर. पानबीन खा. तुमच्या नृत्यगायनाचाहि थोडासा मासला दाखवलात तर मेहेरबानी होईल.

**वारांगना**—( एकीकडे सखीस )–कसा आला मेला लागलींच खुषींत तो पहा. आतां असाच याला खुलवून व चाकरासह यथेच्छ मद्य पाजून आपला चंद्रहार अन् शालु यांसह आणखी ऐवज याच्या पासनं काढून मग रस्ता सुधारला पाहिजे !

**चौकीदार**—कां विनंति केल्याप्रमाणं आहे का मर्जी ?

**वारांगना**—हो हो हें काय ? आपल्या सारख्यांच्या मर्जीबाहेर जाऊन आमचं चालेल कसं ?

**चाकर**—मी तरी हेंच सांगणार होतों.

**चौकीदार**—मग चला. ऐकवाच एखादी चीज.

**वारांगना**—आमची तयारी आहे.

**चौकीदार**—अवदान्या ?.

**चाकर**—जी.

**चौकीदार**—आंत जाऊन बैठक घाल.

**चाकर**—बैठक घालून तयारच आहे.

**चौकीदार**—यांना आंत घेऊन जा.

**चाकर**—हा चाललों आंत घेऊन.

**चौकीदार**—नाहीं, पण तूं इथंच बैस.

**चाकर**—बसलों इथंच.

**चौकीदार**—मी येईपर्यंत इथनं कोणाला जाऊं देऊं नकोस. सर्वांना अटकावून ठेव.

**चाकर**—अटकावून ठेवतों. ( वारांगना जाऊं लागते तिला. ) हां अंदर. मज्जाव !

**चौकीदार**—अरे यांना नव्हे; यांच्या मागून- आतां जे कोणी प्रवासी जायला येतील त्या सर्वांना अटकावून ठेव, समजलास ?

**चाकर**—समजलों.




**चौकीदारः—**
" का ? विनंती केल्याप्रमाणें आहे का मर्जी ? " [ प. ३६

**अवदान्याः—**" थोडं का ? पुष्कळ दिलंत तर पुष्कळ पुण्य लागेल आपल्याला ! " [ प ३७

( वारांगना, चौकीदार जातात; चाकर सखीला मागं थांबवतो. )

**चाकर**—अहो, अहो, हें काय आहे म्हटलं आपल्या हातांत ?

**सखी**—हें का ? हें तीर्थ आहे म्हटलं देवीचं.

**चाकर**—तीर्थ, आन् तें असल्या भांड्यांत ? हें तर आमच्या ओळखीचं दिसतंय.

**सखी**—आहे वाटतं नित्यनेमांतलं ?

**चाकर**—तें काय सांगावं ! एक वेळ जेवण चुकेल. पण हें घेतलंच पाहिजे. मोठा कडक नियम !

**सखी**—कुळधर्मच तो.

**चाकर**—नाहीं नाहीं. तो सुद्धां टळेल.

**सखी**—पण हा ?

**चाकर**—अगदीं टळायचा नाहीं.

**सखी**—मग देऊं का थोडसं ?

**चाकर**—थोडसं कां ? सगळं दिलं तर पुष्कळ पुण्य लागेल !

**सखी**—घे तर मग.— पण थांब, तीर्थ घेण्याचा मंत्र येतोय का तुला ?

**चाकर**—पुष्कळ येतात; पण माझं तोंड गुंतणार यांत; तेव्हां तो आपल्याच तोंडानं चालूं द्या.

**सखी**—बरं. तर ऐक—

( चाल—दिलो जानी मोरे दिलजानी. )

**जशि सुरां सुधा तशि नरांप्रती ही मदिरा ॥ नववधू जशी प्रिय असे जरायुहि विधुरा ॥ धरिति जे हिला क्षण जन अधरा ॥ पावती भवाच्या पैलतिरा ॥ दे मोक्ष पितरां ॥ जशि० ॥**

( त्याला बुलकावित घुलकावीत चुकवून आंत जाते, तो फसल्यामुळें बावळट मुद्रा करून मागून जातो. )

---

## प्रवेश तिसरा.

( स्थळ, मलियाळदेश. देखावा—परिमळा राणीचा दरबार.—
पात्रें—सुगरमालती, चंपककली, चंद्रकला, वगैरे
दरबारी स्त्रिया बोलत येतात. )

**सुगरमालती**—कां चंद्रकला बाई, आज तरी राणीसाहेबांची स्वारी दरबारला यायची आहे का ?

**चंद्रकला**—आज यायचा बेत तर दिसतोय. अन् बरोबर नाथमहाराजांनाहि त्या घेऊन येणार आहेत असं वाटतं. कारण सिंहासनावर दोन आसनं मांडायला सांगितलीं आहेत.

**सुगरमालती**—आज हें काय आहे बरं ? कांहीं विशेष राजकार्य दरबारांत व्हायचं दिसतंय.

**चंपककली**—राजकार्य कसलं ? कर्णाटकांतनं कुणी एक वारांगना आली आहे; नाथमहाराजांच्या करमणुकीसाठीं अन् तिच्याहि गुणांचा राजकीय थाटानं गौरव करण्याकरितां मुद्दाम दरवार भरवून इथंच तिचं आज नृत्यगायन करिवण्याचा विचार आहे.

**सुगरमालती**—नाथमहाराजांची सुटका आपल्या बळकट प्रेमपाशांतनं आमच्या राणीसाहेब कांहीं लौकर होऊं देत नाहींत. म्हटलं असतां कुमार मैनीनाथाच्या रूपानं नाथमहाराजांनीं राणीसायबांना आपल्या या प्रेमप्रतिबंधाबद्दल भरपूर खंडणी भरली. तेव्हां वाटलं होतं कीं, त्यांची आतां तरी लौकर सुटका होईल. पण दिवसानुदिवस अधिकाधिकच मोहजाल त्यांच्या भोंवतीं पसरलं जाऊन, त्यांत ते कायमचे गुंतून राहतील असे नित्य नवेनवे प्रयत्न चालले आहेत. आन् ती स्वारीहि पण इकडे खुशाल नादावली आहे !

**चंद्रकला**—बाई सुगरमालती, तूं राणीसाहेबासंबंधानं कांहीं म्हण, पण या सिद्ध पुरुषांच्या मात्र वृत्तिव्यवहाराची कल्पना केवळ आपण आपल्या मनोव्यापारावरनं ठरविणं कांहीं चांगलं नाहीं. ती खरोखरच अचिंतनीय असते. यांची सदां देही असून विदेहि स्थिति. अंतर्मुखदृष्टि. बसले तिथंच बसले. स्वरूपाच्या ठिकाणीं सदां निमग्न. त्यांना मुळीं देहभानच नाहीं. जोग काय

आणि भोग काय. दोन्ही उपचारांचं सुखदुःख त्यांना सारखंच. एखाद्या मूर्तीला ज्याप्रमाणं आपण आपल्या हौसेनं वाटेल तशी नटवावी; पण वस्तुतः ती मूर्ती ज्या द्रव्याची बनवलेली असते त्या द्रव्याला त्या नटवण्याचा अनुभव नाहीं; तसंच असल्या माहा सिद्ध योग्यांशीं राणीसाहेबांच्या चाललेल्या या क्रीडांविषयीं समजावं.

**चंपककली**—या विलासोपचारांनीं नाथमहाराजांची स्वारी इथं नादावली आहे असं म्हणण्यापेक्षां, मला तर वाटतं कीं, आमच्या राणीसाहेबच नाथांच्या भोंवतीं पसरलेल्या मोहजालांत त्यांना घेऊन आपण स्वतः गुरफटून बसल्या आहेत, हें म्हणणं जास्त शोभेल.

**सुगरमालती**—नाथमहाराजांचा कुणी एक पट्ट शिष्या गोरख म्हणून आहे, तोही अझुनी कुठें येईना इकडे. कारण तो जर आपल्याला शोधीत आला, तर इथनं घेऊन गेल्याशिवाय राहणार नाहीं असं नाथमहाराजांनींच एकदां सांगितलं होतं.

**चंद्रकला**—त्याच्या येण्याची आतां मुळींच आशा नको आहे. यापुढं या स्त्रीराज्यांत जोगीसुद्धां येऊं देऊं नयेत अशाविषयीं सक्त बंदोबस्त हद्दीवरल्या चौक्यांवरनं ठेवलेला आहे.

**चंपककली**—पण त्या पहा, राणीसाहेब आल्या. बरोबरच्या परिवारावरनं तुम्ही म्हणतां तशा प्रकारचाच आजचा इथला बेत: दिसतोय खरा.

( परिमळा राणी, मैनीनाथ, मछिंद्रनाथ, वारांगना वगैरे येतात. )

**परिमळा**—कुमारा, आज काय काय खेळ खेळलास बरं ? सांगायचं नाहीं का तिकडे ?

**मैनीनाथ**—मुळीं त्यांच्यापाशींच तर खेळत होतों मी आई.

**परिमळा**—हो का ? तें काय खेळत होतास बरं ?

**मैनीनाथ**—सांगूं. हें बघ—

( " प्याराप्यारा बना, " या चालीवर. )

**धरुनीया करीं ॥ लघु बासरी ॥ मधुरस्वरी ॥ मुरलीपरी ॥**
**शृंगि दुसरी ॥ ध्रु० ॥ तिच्या नादें ॥ अलख शब्दें ॥ खेळलों**

**मी ॥ नाथछंदें ॥ महामोदें ॥ सुख पावलें ॥ किति तोषले ॥ मनिं आपुलें ॥ धरु० ॥**

**सुगरमालती**—( एकीकडे ) राणीसाहेबांच्या पोटीं आला आहे तरी मुलगा जोगड्याचाच कीं नाहीं. तो असले भिकारच खेळ खेळायचा, उघड आहे !

**परिमळा**— बरं ये बैस. आपण ही मौज घटकाभर पाहूं. इथं मजजवळ बसतोस का तिकडे मांडीवर बसतोस ?

**मछिंद्रनाथ**—हां, आव बेटा. बैठ यहां.

**मैनीनाथ**—अंहः ? मी इथं असा दोघांच्यामध्यें राहतों. एक हात नाथांचा धरीन, आणि एक हात तुझा धरीन; म्हंजे कशी मौज दिसेल बघ—

( चाल—मोहे काननमें तोरी मुरली. )

**जणुं गांठियलीं दिसतिल अशीं हीं दोन महावस्त्रें ॥ जणुं० ॥ काषायांवर एक सतेजचि क्षौम दुजें ॥ गांठि० ॥ जेंवि परस्पर भिन्न विकारचि साधियले ॥ दिसति० ॥**

**चंद्रकला**—( एकीकडे ) हें मात्र कुमाराचं भाषण अगदीं खरं आहे. नाथांच्या रूपानं प्रवृत्तिमार्ग आणि बाईसाहेबांच्या रूपानं निवृत्तिमार्ग या लौकिकदृष्ट्या भासणाऱ्या परस्पर विरुद्ध दोन मार्गांची सुंदर ग्रंथि या कुमाराच्या योगानंच या ठिकाणीं अशी दृढ होऊन बसलेली दिसतेय खरी !

**मैनीनाथ**—आई, तूं गडे माझ्या या गालाचा मुका घे. आन् नाथमहाराज आपण किंनई या गालाचा घ्या बरं !

( दोघे मुके घेऊं लागतात. कुमार मागें सरतो. )

**मैनीनाथ**—( टाळी वाजवून हंसतो. )—

( चाल—मारदियोरे पपिभाई मारदियोरे. )

**मौज जाहली ॥ अहा मौज० ॥ दोन मुखें घेत मुके येथ पाहिलीं ॥ कौतुकस्थलीं ॥ अशा कौतुकस्थलीं ॥ कां न तुके सहज सुखें मान आपुली ॥**



**मच्छींद्रनाथः**—( रा. दत्तोपंत भोसले. )—
" अहाहा ! यही केवल निर्व्याज बाललीला है ! "

[ पृ. ४]

**परिमळा**---चल. कायरे चावट आहेस ?

**मच्छिंद्रनाथ**---आहाहा ! यही केवळ आनंदमय निर्व्याज बाललीला कहते हैं. ऐसी सहजावस्था निरंतर रहे तो जीवन्मुक्तदशा और कुछ थोडी है !

**परिमळा**---बरं कुमारा पुरें आतां हें. ( सर्वजण आपापल्या ठिकाणीं बसल्यावर वारांगनेस ) हं चालूं द्याग तुमचं नृत्यगायन.

( वारांगनेचें नृत्य सुरू होतें. शेवटीं शेवटीं मृदंग वाजवतांना गोरख त्यांतून खुणेचे शब्द काढतो. ते ऐकतांच मच्छिंद्रनाथ इकडे तिकडे पाहूं लागतात. )

**परिमळा**---अगबाई ! नाथांची स्वारी एकाएकीं अशी कावरीबावरी कशानं झाली बरं ? ( वारांगनेस ) हं थांबा पाहूं अमळ.

**मच्छिंद्रनाथ**---( आपल्याशीं )--नहीं; यहां तो कोई नहीं. फिर मुझको यह क्या भूल पडी.

**परिमळा**---नाथ महाराज, आपल्याला काय पाहिजे ? असं काय आपण करतां हें ?

**मच्छिंद्रनाथ**---कुछ नहीं. यह चलने देव. इनका नृत्य क्योंकर बंद किया ?

**परिमळा**---( वारांगनेस ) बरं तर चालूं द्याग.

**वारांगना**---( पुढील पद्य म्हणून नाचते. )---

( चाल---सोरेमगारे सारेगरेसा. )

**कुसुमांजलि कुसुमशरा ॥ प्रति ईश्वर प्रणयपरा ॥ कुसु० ॥**
**त्रिभुवनास करि अंकित ॥ विजयांकित नच दुसरा ॥ कुसु० ॥**

( सांकेतिक बोल पुनः मृदंगांतून ऐकूं येतात. नाथांची गडबड उडते. )

**परिमळा**---छे बाई, आज कांहीं नाथांची तब्येत ठीक दिसत नाहीं. बस्स पुरे करा आतां हें नृत्यगायन. चंद्रकले, जा. आन जामदारखान्यांतनं यांना, उत्तम वस्त्रं व जवाहीर बक्षीस देऊन निरोप दे.

( वारांगना, तिचा परिवार व चंद्रकला जातात. )

**मछिंद्रनाथ**—( आपल्याशीं ) नहीं यह क्या भ्रम है ? इस्कु अब अंतर्दृष्टीसे सोचना चाहिये. ( समाधि लावून बसतात. )

**परिमळा**—अगबाई ! नाथांनीं समाधि लावली वाटतं. तर मग क्षणभर सगळ्याजणीं बाहेर चला कशा. या ठिकाणीं त्यांना अगदीं निर्वेध असूं द्या. चल कुमारा, आपण सुद्धां थोडा वेळ एकीकडे जाऊं.

**मैनीनाथ**—आई, आपले नाथ कायग अशी केव्हां केव्हां मधेंच झोंप घेतात ती ?

**परिमळा**—अरे बाळ ती झोंप नव्हे. याला योग्यांची समाधि म्हणतात. सगळ्या जगामध्यें जेवढीं म्हणून कांहीं उत्तम सुखं आहेत, तेवढीं सर्व एकत्र केलीं, तरी सुद्धां त्यांच्यापेक्षां हें समाधिसुख कांहीं विशेष असतं असं नाथ सांगत असतात. नाथांचं हें दिव्य तेज, त्यांचं अपार सामर्थ्य, सर्व कांहीं याच समाधिसुखाच्या प्रभावामुळें होय.

**मैनीनाथ**—आई, मलाही वाटतं कीं, नाथांच्या प्रमाणं आपण दिखिल तें समाधिसुख मिळवावं.—

( चाल–ईश्वरपंकज मत्तमतंगज. )

**वस्त्र सुभूषण टाकुनि देउनि चर्चुं विभुति देहा ॥ मज खेळ असे प्रिय हा ॥ दुसरी न स्पृहा ॥ व० ॥ स्वकरीं बसुं घेउनि जपमाळ ॥ पसरुनि भूवरतीं मृगछाल ॥ सैली शृंगी अंगीं धरुनी म्हणविन नाथाचि हा ॥ मज० ॥ वस्त्र० ॥**

**परिमळा**—नाथांचा अंशभूत तूं आहेस. तेव्हां अशी वासना तुझी असणं हें ठीकच. बरं पण चल, इथं त्यांना आतां गडबड नको. ( जातात. )

**मछिंद्रनाथ**—( समाधि विसर्जन करून ) बस्स समजीलया. वह मृदंगीहि मेरा गोरख है. मृदंग बजाते बजाते " चलो मछंदर गोरख आया " ऐसे बोल मृदंगसे निकालकर मेरेको इस मोहनिद्रामेंसे उसीनें जागृत किया. किसी औरकी यह शक्ति नहिं है के मुझको इस तऱ्हेकी सूचना दे. मेरा गोरख भगवान विस्नूका अंसावतार है. परदोखसमय जब महादेवी सक्तिके आगे हमारे आदि-

नाथ भगवान संकर तांडव नृत्य करते हैं तब महाबिस्नूही मृदंग बजाते हैं. अर्थात् मेरे गोरखकी मृदंगबादनकी कुशलता स्वयंभू है. यह तो ठीक हूवा. परंतु अब मेरा गोरख फिर मुझको कहां मिलेगा. जो यहांतक मेरा पता गोरखने निकाला तो वोह मेरेको ऐसा संशयमें छोडकर यहांसे नहीं जायगा. इधर उधर कोई एकांत अस्थानमें मेरी राह देखता हुवा वो अवश्य ठहेरा होगा. धन्न मेरे गोरख. धन्न हे तूं. तेरा अधिकार, तेरी गुरुभक्ति, तेरी चतराई अवर्णनीय हैं.

( जातो. दुसऱ्या बाजूनें परिमळा, मैनीनाथ, चंद्रकला, सुगरमालती त्याच ठिकाणीं येतात. )

**परिमळा**—काय, गेली ती वारांगना ? अगदीं संतुष्ट चित्तानं गेलीना ?

**चंद्रकला**—तिच्या योग्यतेपेक्षांहि तिला अधिक देणगी मिळाल्यावर कां नाहीं जाणार संतोषानं ? बाकी तिच्याबरोबर ती जी बुरखेवाली बाई होती, तिचं समाधान झालेलं दिसलं नाहीं. खुद्द मला नाथमहाराजांच्या हातनं कांहीं देणगी मिळाली पाहिजे असं ती म्हणाली.

**सुगरमालती**—अगदीं नाथमहाराजांच्या हातनं ! हं !

**परिमळा**—अगबाई ! माझ्या नाथांना ती भाळली कीं काय ?—

( चाल–तुझे मेरी कसम बोल गुंयासे है. )

**बघुनियां सुतनु हरि मोहित कुब्जा जैसी ॥ ब० ॥ जणु जांबुवंति दुसरीशी ॥ पडुं गळां पाहते अशी ॥ माझ्या प्रियाच्या पहा ही खुळीशी ॥ ब० ॥**

**सुगरमालती**—मग राणीसाहेब, यांत कांहीं नवल नाहीं. लोकांना नवल वाटण्यासारखी गोष्ट आहे ती वेगळीच. लोक काय म्हणतात तें सांगूं कां आपल्याला ?

**परिमळा**—हं, सांग बरं.

**सुगरमालती**—ते म्हणतात–

( चाल—आज शाम मोहननें बासरी. )

**त्रिभुवनांत ही अनुपम सुंदर अशि जी प्रमदा ॥ नाहिं उणी तिळहि जिला सौख्य आणि संपदा ॥ रतली ती सहज**

**कशी या विरक्त मूर्तिवरी ॥ ही अपूर्व प्रीति काय, काय रसिकता तरी ॥**

**परिमळा**—अग पण विरक्त स्थितींतले असले म्हणून काय झालं? माझे नाथ आहेतच तसे—

( चाल–जयसच्चित्सुखविश्राम. )

**समाधिसुखविश्रान्त ॥ प्रियकर ती मूर्ती ॥ संसृतिभयनिर्भ्रान्त ॥ प्रियक० ॥ निरस्तमायाध्वान्त ॥ प्रियक० ॥ विश्रमयोगें श्रांत जी ॥ निर्भ्रमें सुप्रसन्न ॥ मायापटलें न झांकली ॥ सतेज सहज नितान्त ॥ प्रिय० ॥**

**सुगरमालती**—असं आहे तर मग त्या मृदंग वाजवणाऱ्या बाईला तरी खुळी कां म्हणावी ?

**चंद्रकला**—ती बाई मग त्या वारांगनेबरोबर न जातां नाथांच्या मुद्दाम भेटीसाठीं पुनः इकडेच परत आली आहे.

( सर्व चौकस मुद्रेनें इकडे तिकडे पाहतात. )

**मैनीनाथ**—अग पण आई, इथं कुठं आपले नाथ दिसत नाहींत ते ? मघां याच ठिकाणीं नव्हते का ते बसले समाधि लावून ?

**परिमळा**—खरंच. इतक्यांत स्वारी कुठें गेली. शोधा तरी इकडे तिकडे जाऊन त्यांना ! आज बाई नाथांच्या वृत्तींतली नेहमींची शांतता नाहींशी होऊन ती फार चंचल झालेली दिसली; मग काय झालंय कोण जाणें !

( चंपककली येते. )

**चंपककली**—राणीसाहेब, मघां ती वारांगनेबरोबर बुरखा घेतलेली एक बाई होती किं नाहीं, तिचा हात धरून आत्तां आपले नाथ पुष्करणीशेजारच्या एका एकांत वृक्षकुंजांत गेले !

**सुगरमालती**—एकांत वृक्षकुंजांत, आणि बुरखेवाल्या बाईला बरोबर घेऊन !

**चंपककली**—पाठोपाठ मी जात होत्यें, काय प्रकार आहे तो पहायला. पण मला येऊं नको असं नाथांनीं खुणेनं सुचविलें, तेव्हां मी आपली परत फिरल्यें.

**परिमळा**—काय म्हणतेस, स्वतां पाहिलंस तूं हें ?

**चंपककली**—राणी साहेब, मी खोटं नाहीं सांगत हें. प्रथमतः बागेच्या दरवाजापाशींच दोघांची गांठ पडली. त्या वेळीं नाथांनीं तिचा बुरखा थोडा एकीकडे करून तिच्या तोंडाकडे पाहिलं आन् मग दोघांनींहि कांहीं चमत्कारिक शब्द उच्चारून एकमेकांला मोठ्या आनंदानं क्षणभर घट्ट आलिंगन दिलं.

**सुगरमालती**—वः ही तर आतां अधिकच मुद्याच्या गोष्टी सांगूं लागली !

**चंद्रकला**—राणीसाहेब, आपण मघाशीं म्हटलंत कीं माझ्या नाथांना ती भाळली वाटतं. पण या चंपककलेच्या सांगण्यावरून तीं दोघेंहि एममेकांवर भाळलेलीं दिसतात !

**सुगरमालती**—आमच्या नाथांना ती भाळली यांत कांहीं आतां नवल नाहीं. पण नाथांनीं तिच्यावर भाळावं अशी नाथांना तिच्यांत काय विशेष मोहनी आढळली याबद्दल मात्र राणीसाहेबांना मोठा विचार पडेल खरा !

**परिमळा**—सुगरमालती, गडे या वेळीं तूं मला लावून बोलशील तितकं थोडं आहे ! पण एकंदरींत हे पुरुष बेमानच कीं काय कोण जाणें !

( चाल—बघुनि त्या भयंकर भूता. )

**परिणिलें असुनि एकीतें दाविती प्रेम दुसरीला ॥ नादावुनि तिसरिस देती सहशपथवचन भलतीला ॥ आलि एक मंजरिस चुंबी भोंवतीं गुंग एकीच्या ॥ रसपान एकिचें पेशा कृति नरहि करी मधुपाच्या ॥**

**सुगरमालती**—म्हणूनच तर पार्वतीमातेनं आपल्याला हें केवळ स्त्रियांचंच राज्य करून देऊन यांत त्या मेल्या बेमान पुरुषांचा कांहीं एक संबंध ठेवूं दिला नाहीं.—परंतु बाईसाहेब, आपण नाथमहाराजांच्या प्रेमांकित होऊन पार्वतीमातेच्या या अनुग्रहाविरुद्ध गेलांत त्याचं हें फल आपल्याला मिळत आहे असं म्हटलं पाहिजे.

**चंपककली**—होय. तसंहि असेल.

**चंद्रकला**—पण राणीसाहेब, आपण ह्या आपल्याच ठिकाणीं कल्पना करून मनाला त्रास कां बरं करून घेतांहां ? मला वाटतं तिकडे जाऊन अगोदर स्वतः सर्व काय प्रकार आहे तो पहावा.

**परिमळा**—बरं तर. संभाळा तुम्ही कुमाराला. मी एकटीच तिकडे जाऊन समक्ष काय प्रकार आहे तो पहात्यें. नाथमहाराज, खरोखर आपण माझी अशी फजीती करायची नव्हतीत.—

( चाल—वारी जाऊं रे सांवरिया. )

**किति प्रेमळ निर्मळ निश्चल माझा भाव आहे ॥ माझा० ॥**
**तनुमनधन हीं तुमचे ठायीं ॥ वाहियल्याचें फल हें काई ॥**
**बीज मधुर त्याप्रति कटु अंकुर योग्य नोहे ॥ कि० ॥**

---

## प्रवेश चवथा.

( **स्थळ**—नजरबाग. पात्रें, मछिंद्रनाथ व गोरख. )

**मछिंद्रनाथ**—सुन बेटा गोरख; इस रानीको मेरा बचन है कि जब गोरख मेरेको लेजानेके लिये आपहुचेगा, तब मय उसके साथ चला जाऊंगा. एक पलभी यहां रहेना फिर मेरा मुष्किल है.

**गोरख**—अच्छा तो अब चलिये. रानीकी तरफसे आपको किसी तरेहका हरजा न होगा.

**मछिंद्रनाथ**—नहीं बेटा. यह बिखयलोभी प्रपंची लोक बहोत अदूरदृष्टि रहेते हैं. तुम्हारा परताप वो क्या जानें. बचन देतेसमय रानी समझीहोगी कि गोरख इतनी दूर केवल इस्त्रियोंके राज्यमें क्योंकर आवेगा; और वो मेरेको क्योंकर ले जावेगा. ऐसा समझकर उसीने भाख दे चूकी. परंतु अब मय यहांसें तुम्हारे साथ चलुंगा तो वो वहोत दुःखी होगी. शोकमूढ बनकर बिल्कुल अन्न-पानी तजेगी. ऐसी बिपत्तीमें उसको छोडकर यहांसे जाना ठीक नाहीं. तुम्हारे दरसनका और हमारे सहवासका इन प्रपंची लोगोनें अंतिम दुःख पाना यही जोग्य फल है क्या ?

**गोरख**—सांई साहाब, हरएक मनुष्य आपनें कर्मानुसार अच्छा और बुरा फल पाता है. कल्पतरूके पास खडा रहेनेपरभि इच्छानुसार फल मिलता है.

तुम्हारी संगत करनेमें इस रानीकी केवल क्षुद्र बिखयवासना थी. पस्स, वैसाही फल उसको परतक्ष पुत्ररूपसे मिला है. इस्से अब अधिक फल पानेका अधिकार कहां है ?

**मछिंद्रनाथ**—हां, न्यायकी हिसाबसे यह बराबर हूवा. परंतु सुन बेटा, गोरख; भगवत्सत्तामें केबल न्यायहि दर्शित नहीं होतां है. बल्के न्याय और कृपा दोनों मिश्र रहती है. दोनोंको अन्योन्याश्रय है. कृपासे न्यायका स्वरूप सौम्य होता है. और न्यायसे कृपा मर्यादित होती है. दोनो परस्पर भूखणी और अवश्यही है.

**गोरख**—सत् है साई. पर मेरी एक और बिनती है. आपके गुरुभाई जलंधरनाथ उनको सुंदरपूरका राजा गोपीचंदनें खाईमे फेंककर लीदके नीचे दया रख्खे हैं. उनको उस खाईमेंसे निकालनेकेलिये उनके चेले कानफनाथ कोशीसकर रहे हैं. परंतु आप ऐसे अधिकारीओंके बिना मदत किये, मय जानतांहूं के ओ कुच्छ न करसकेंगे. यदि गोपीचंद राजा इस काममें वहोत अपराधी है तोभि वो महारानी मैनावतीका पुत्र है. उस रानीनें जलंधरनाथका अनुग्रह लीया है. इसलिये जलंधरनाथके क्रोधाग्नीसे गोपीचंदका रच्छन करना उनको अवश्यही है. और यह कार्य बगेर आपके न होगा.

**मछिंद्रनाथ**—भला, उनकाभि बिचार अवश्य करेंगे. पर वो देख. परिमलारानी इधर आती है. मयने जो कहा ऐसी उसकी कुच्छ तरहसे संतोखवृत्ति रखकर आप दोनों यहांसे जायंगे ऐसी तजवीज करना अवश्य है यह भूलना नहीं.

( परिमळा येते. )

**परिमळा**—( दचकून ) अगबाई ! हा तर जोगडा. तर मग ज्या दसाका आजपर्यंत भीत होतें तेंच पुढें येऊन राह्यलंयसं दिसतं. हा गोरक्षच असावा. पण इतक्या बंदोबस्तानं तो माझ्या राज्यांत कसा आला. अथवा समजल्यें. ती बुरखेवाली मृदंग वाजवणारी बाई नसून तसल्या त्या कपटवेषानंच यानं गुप्तपणानं इथपर्यंत प्रवेश केलेला दिसतोय हा ! आतां माझ्या नाथांना हा खचित घेऊन जाईल ! ( नाथांच्या गळ्यांत मिठी मारून ) नाथ, प्राणनाथ, आपण मला शेवटीं सोडून जाणारच ना आतां ?

**मछिंद्रनाथ**—देख बेटा गोरख. पूर्व संकेतके अनुसार अब मय यहांसे तेरे साथ चला जाउंगा इस बातकी केवळ कल्पना मनमें आई तो इस प्रेममूढ रानीकी क्या अवस्था हुई ? अब इसको मय क्या समझावूं और कैसे समझावूं ?

( रंगभूमीच्या मागें डाव्या अंगानें मैनीनाथ धांवत येतो.
मागून चंपककली येते. )

**मैनीनाथ**—( तिला झिटकारून ) चल सोड; मी नाहीं तुझं ऐकत जा. एकटाच जाणार त्या पुष्करणीकडे मी—( धांवत जातो. )

**चंपककली**—अरे अरे कुमारा, थांब थांब. गेलाच बाई हा. हा का आमचं ऐकणार आहे ? सांगावं तरी कुणाला ? एकटाच त्याला पुष्करणीकडे कसा जाऊं दिलात म्हणून राणीसाहेब रागं भरतील. हातांतला खाऊसुद्धां पुरता खाल्ला नाहींन्. सारा अंगावर सांडून घेतला आहेन्.—अगबाई, पण ह्या राणीसाहेब कां अशा ? आणि हा आणखी एक जोगडा कोण ?—नाथमहाराज, कुमाराला आपण तरी हाका मारा. आमचं कांहीं कुणाचं तो ऐकणार नाहीं. एकटा पुष्करणींत सारखा डुंबत बसेल आतां ?

**मछिंद्रनाथ**—सुन गोरख—

**चंपककली**—अगबाई, हाच वाटतं तो गोरख. तरीच हें.

**मछिंद्रनाथ**—यह स्त्रीके साथ तूं जाकर कुमारको पुष्करणीसे ले आना. यदि उसकी मनशा पुष्करणीमें आस्नान करनेकी हो तो उसको अच्छी तरहसे शुद्ध करके ले आव.

**गोरख**—जैसी आज्ञा. ( जातां जातां आपल्याशीं ) हमारे गुरुनाथ यह संसारपाशसे सामान्य जनोंके तरह देखो कैसे लिपटे रहे हैं. अब इनको बिना किसी तेज दवा पिलाये इनमें नखशिखान्त भिनेहुवे बिखयबिखकी किसी तरेह शांतता न होगी. चलो. इस सब मायामोहका मूल यह कुमारही है. तो अब पहेले इसी जडको काट डालना चाहिये.

( चंपककली व गोरख जातात. )

**मछिंद्रनाथ**—प्यारि परिमला, यह क्या करती है. होषमें आ. होषमें आ.

**परिमळा**—( सावध होऊन )—कशाला आपण मला सावध केलीत ही ! आपलं आतां हें विरहदुःख अनुभवण्याकरितांच ना ? मग त्यापेक्षां मी मूर्च्छित

असलेलीच काय वाईट बरं ? नाथ, आपण जरं मला सोडून गेलांत तर माझी स्थिति काय होईल ? अहो—

( चाल—गायन करुनी. )

**विषय भंवते विषचि ते गमतिल मज सगळे पाहतां ॥ साव-**
**धता सुखराहिता ॥ प्रियाविराहित नलगे तो अतां ॥ विरह-**
**युता उर्वरिता ॥ दिननिशि काशि कंठूं जीविता ॥ वि० ॥**

**मछिंद्रनाथ**—अरी प्यारी, अग्यानी स्त्रीके तरह मुखमलीन करानेवाला यह शोक छोड दे. और विचारदृष्टीसे देख. योगींद्र और नरेंद्र यह किसीकेभी मित्र नहीं होते हैं. बहोत काल येक जगे उनका बास होनाभी अशक्य है. देख प्यारी—

( चाल—सद्गुरु संसारी संसारी. )

**संगत मतकरना ॥ तूं मत० ॥ ध्यान निरंजन धरना ॥ सं० ॥**
**अखिल दुःखका मूल जगतमें संगाबेना नाहिं कोई ॥**
**संगत टूटे मोह हटे संसार मिटे क्या कहेना ॥ सं० ॥ सब**
**संगतमें सत्संगतको कहते तारिफ भारी ॥ साधन है पर**
**वोभि समझना, साध्य बस्तु है न्यारी ॥ प्यारी सं० ॥**

—ऐसा है तोभि प्यारी तेरेको मेरा बिरहदुःख कभी न होय ऐसा तेरेउपर अनुग्रह कियेबिना मय यहांसे नहीं चला जाउंगा.

( चंपककली घाबऱ्या घाबऱ्या येते. मागून गोरख येतो. )

**चंपककली**—राणी साहेब, राणी साहेब, आपला कुमार या मेल्या जोगऱ्यानं पुष्करणीच्या पायऱ्यांवर आपटून मारून किं हो टाकला !

**परिमळा**—हारे कुमारा ! ( मूर्छित पडते. )

**मछिंद्रनाथ**—( तिला सांवरून )—गोरख यह तूने क्या किया बेटा !

**गोरख**—गुरुनाथके हिर्दयमें मायामोहका जो एक कांटा घुस रहा है वो निकालनेका यह एक मार्ग बनाया.

**परिमळा**—( सावध होऊन )—

( चाल–सुरपुरीचें कार्य पहा त्वरित. )

**असतां प्रिय नाथविरहचिंतानल तप्त अशी ॥ अप्रिय हें वृत्त वरी अग्निचीच वृष्टि जशी ॥ एकचि मज संकट हें दुःसह असतांहि पुरें ॥ हा दुसरा वज्रपात घातें या हृदय चुरे ॥**

**मछिंद्रनाथ**—अरे बचपनमें तेरेको जब मय संजीवनीमंतर सिकलायाथा तब एक दिन उस मंतरका पाठ करते बखत तूं आपने हाथसे जो एक मट्टीका पुतला बनाताथा वोभि झट सजीव होगया. ऐसा तेरा अमृतकर होकर अब कैसा विख-मय हूवा बेटा ?

**गोरख**—गुरुमहाराज, आपकी आग्यानुसार कुमारको ऐसा धोकर शुद्ध किया है के अब वो फिर कभी अशुद्ध न होगा. और आपने संगतसे दुसरेकोभि ऐसा अशुद्ध न करेगा.

**मछिंद्रनाथ**—बच्चा, यह प्रेमपाश इस तरेह तोडकर यहांसे मुझको लेचल-नेका यह तेरा कठोर मार्ग मुझको बिलकुल पसंत नही है. क्या, अरे मुझकोभि तूं प्रेममूढ समझता है बेटा ?

**गोरख**—नहीं गुरु. क्षमा कीजिये.

**पारेमळा**—थांब मेल्या. अशा कृत्याबद्दल नुसत्या क्षमेनंच तूं सुटशील असं समजतोस काय ? अरे—

( चाल–कंठचरचर चिरुनि मारीन. )

**बद्ध होउनि शृंखलांनीं भोग कारागृहसुखा ॥ वृत्ति निर्दय कशी तव ही गुरुसुताशींहि दुर्मुखा ॥ साधुवेषें दुर्जनाचि तूं धेनुमुख शार्दूलसा ॥ पुत्रपतिविरहानलें अबलेस पोळिशि राक्षसा ॥**

**गोरख**-( हंसत ) अरी माई, तूं क्यंव अपने जीको ऐसी नाहक सता रही है. तेरे क्रोधका, जैसा मुझको कुछ डर नहीं मालुम होता, वैसाही तेरे इस निष्कारण शोकसे मेरे हिर्दयको द्रवभि नहीं आता. गुरुकृपासे मय जन्ममरणातीत हूं, अब तूं मुझको क्या शासन करेगी ? जिसको देहसंबंध नहीं, ऐसे मनुष्यको तूं क्या

प्रतिबंधमें रखेगी ? और जो कर्तृत्वाभिमानरहित है उनको तूं कैसा गुन्हेगार बनायगी ? बोल.

**परिमळा**—पुरे कर मेल्या तुझं हें कोरडं ब्रह्मज्ञान ! वाटेल तशीं घोर कृत्यें करून त्यांतनं आपण नामानिराळे आहों असं निर्लज्जपणानं सांगतां येण्याकरितांच ही जोगदीक्षा पांघरली आहेस वाटतं ? अरे—

( चाल–मिलाता गुल रफूंसे दिल. )

**करुनि करणी कसाबाची ॥ वदसि वचनें महात्म्यांचीं ॥ वृथा हा शीण वाणीला ॥ तसा तो दोष वाणीला ॥ दिलें असुखांत ढकलोनी ॥ अह्मां सकलांस येवोनी ॥ कथिशी गोष्टी मुखें आशिवें ॥ दया हृदया परी न शिवे ॥**

**गोरख**—भला माई, तूं आपने पुत्रके विषयमें दुःखी है; परंतु पहिलेहीसे जो वस्तु क्षणभंगुर है, क्या उसीके बाबत शोक करना व्यर्थ नहीं है ? खूब विचार कर. अब तूने कैसाभि परिश्रम किया तो नष्टता पाई हुई वस्तु फिर तुझको कैसी मिलेगी ? हां यदि तूं मेरेको वचन देगी तो गुरुनाथकी कृपासे मय तेरा पुत्र निःसंशय ला दूंगा. मेरा बचन पूरा करना कुछ मुष्कील काम नहीं है. तुझे तेरा कुमार मय दूंगा; परंतु उसीके बदला मय गुरुनाथको यहांसे अब ले जाऊंगा. है कबूल ?

**चंपककली**—( एकीकडे राणीस )—राणीसाहेब, हा मोठा वस्ताद जोगडा दिसतोय. याच्या मर्जीनंच आतां घेतलं पाहिजे. पुत्रविरहानं नाथही ज्या अर्थी गहिंवरले आहेत, त्या अर्थी केवळ याच्याच सांगण्यानं तुमचा मोह ते सोडून जातील असं कांहीं दिसत नाहीं.

**परिमळा**—बरं तर, घे हें वचन. दे माझा मैनीनाथ मला ह्या क्षणीं आणून. मग पाहिजे तर, मी नाथांना संतोषानं निरोप देईन.

**गोरख**—अच्छा तो वो देख !

( देखावा–पूर्वींची बाग नाहींशी होऊन जिकडे तिकडे हजारों मैनीनाथ दिसूं लागतात ! परिमळा व दासी आश्चर्यचकित होऊन स्तब्ध उभीं राहतात. )

**मछिंद्रनाथ**--धन्न मेरा गोरख, धन्न है तूं ! क्या तेरी प्रशंसा करूं ! तेरेको क्या धन्नवाद दूं ! तूं मेरा आनंदसागर है ! देख प्यारी परिमळा. तेरी मनषा एकही मैनीनाथ प्राप्त होनेकी थी. परंतु मेरे गोरखनाथकी सिद्धिपरभावसे तेरेको अब असंख्यात मैनीनाथ मिले हैं. इसमेंसे अब तूं किसके लिये शोक करेगी और आनंदभी किसकी सुसंगतसे तेरेको होगा. यह सब संसार ऐसाहि मायारूप हैं. इसको भुलना नहीं. सब जगत परमात्मसरूपके अंसभूत है ऐसा अनुभव दृढ धारण कर सब घटमें आप है और आपहीमें सब घट भरे है यह देख लेना. सद्विचारसे इसको अच्छी तरेहसे सोचनेसे इस संसारसागरसे तूं निःसंशय तैर जावेगी. तूं कोई सामान्य स्त्री नहीं है. स्वर्गस्थानकी अप्सरा है. श्रापकेलिये कुछ अवधितक तेरा इस देहमें अवतार है. आपने सत्सरूपको भूलकर काहेको यह भवभ्रममें मूढ होती है.

**परिमळा**--( नम्र होऊन )--नाथ महाराज, हा वेळ पावेतों केवळ अज्ञानपणानें जें माझें वर्तन झालें त्याची मला आतां क्षमा करावी; आतां माझें दुसरें कांहीं म्हणणें राहिलें नाहीं.—

( चाल—वकावली हुं० )

**प्रणयिजनसे भाविलें मी ॥ शुद्ध विषयाभिलाष धरुनी ॥**
**तुल्य धर्मे राहिलें मी ॥ थोर तुमचा प्रभाव असुनी ॥ परि**
**मत्प्रेम अकृत्रिम होतें ॥ अनन्यैकगति अनुपम शुचि तें ॥ पात्र**
**व्हावी क्षमेस म्हणुनी ॥ प्रण० ॥**

**मछिंद्रनाथ**—अच्छा तो प्यारि यह ले तेरा कुमार मैनीनाथ. अब इसकी सुसंगतसे आनंदमें रहेना.

( खरा मैनीनाथ आणून तिला देतो. मायावी असंख्यात
मैनीनाथ अदृश्य होऊन देखावा बंद होतो. )

**परिमळा**--नाथ महाराज, आपला कृपाकर या दासीच्या मस्तकावर ठेवावा. इथुनें हा देहसंबंध आहे तोंपर्यंत, प्रत्यक्ष जरी नाहीं तरी अप्रत्यक्ष रीतीनें आपली अल्पसेवा या दासीकडून नित्य याप्रमाणेंच होत जाईल.—

( चाल–प्रभुराया तव पाया वंदितिं. )

हृद्भवनीं प्रेमासनिं स्थापुनियां मी प्रिय नाथा ॥ असनीं शयनीं पानीं चिंतिन ते प्रिय गुणगण सगळे ॥ छंदचि दुसरा न मला राहिल तो यापरता ॥ हृ० ॥ घडतिल बहुविध जे जे मत्करवीं देहमनोव्यापार ॥ हेतुच दुसरा न तया नाथ-पदाविण आतां ॥ हृ० ॥

( पडदा पडतो.—अंक दुसरा समाप्त. )



# तिसऱ्या अंकांतील पात्रें व देखावे.

गोपीचंद
प्रधान
मछिंद्रनाथ
कानिफनाथ
गोरखनाथ

जालंदरनाथ
मैनावती
रूपक्या
अतिशयोक्ति
मोहनाराणी–( पट्टराणी )
चंपावती–( बहीण )

( दासी, नृत्यांगना, दरबारी वगैरे. )

---

१ देखावा–पुतळे जाळण्याचा. ( प्रवेश पहिला. )
२ देखावा–झोंपाळ्याचा. ( प्रवेश दुसरा. )
३ देखावा–दरबारचा. ( प्रवेश तिसरा. )



# अंक तिसरा.

( **स्थळ**—राजमहालाजवळची नजरबाग. **पात्रें**—गोपीचंद आणि प्रधान बोलत येतात. )

**गोपीचंद**—प्रधानजी, कानिफनाथांनीं सांगून ठेवलं होतं त्याप्रमाणं सुवर्ण, रजत व ताम्र या तीन धातूंचे तीन पुतळे तयार झाले आहेत ना ?

**प्रधान**—होय सरकार. आपली आकृति आणि परिमाण याप्रमाणं ते सर्व हुबेहुब तयार करवून ठेवले आहेत. आतां त्यांचं पुढं काय करायचं त्याबद्दल आज्ञा व्हावी.

**गोपीचंद**—तर मग ते सर्व पुतळे त्या खाईकडे नेऊन तिच्या कांठावर तीन बाजूंला तीन नीट रीतीनें उभे करून ठेवा.

**प्रधान**—बरं आहे. आज्ञेप्रमाणं करतों.

( रूपक्या येतो. )

**रूपक्या**—महाराज, सूर्योदयापूर्वीं जसा अरुण प्रकाश पडावा, किंवा पाकसिद्धि होतांच ती दृष्टीला पडण्यापूर्वीं तिचा जसा खमंग सुवास यावा,—

**गोपीचंद**—( मध्येंच ) अथवा एखादा महत्वाचाहि निरोप तुजकडून समजतांना अगोदर तुझा जसा मूर्खपणाच पुष्कळसा ऐकावा लागावा !—

**रूपक्या**—( ओशाळून ) नाहीं; म्हटलं, त्याप्रमाणं मछिंद्रनाथांचा एक शिष्य इतक्यांत इथं येऊन पोंचला आहे. म्हणून तेहि आतांच येतील असं त्यानं सांगितलं आहे.

**गोपीचंद**—जा तर मग. महालांत जाऊन मासाहेबांना हा निरोप कळीव, आणि त्यांनाहि गुरुदर्शनासाठीं घेऊन ये.

**रूपक्या**—जी. ( जातो. )

**गोपीचंद**—प्रधानजी, तुम्हीहि त्या खाईकडे जा. आणि आंतली लीद, माती वगैरे भराभर बाहेर काढून टाकतां येईल अशी सर्व तयारी करून ठेवा. आम्ही येतोंच तिकडे.

**प्रधान**—आज्ञा. ( जातो. )

**गोपीचंद**–(स्वगत) एकंदरींत मनुष्याचं मन दुर्बल हेंच खरं. कानिफनाथांनीं किती तरी प्रकारांनीं मला आश्वासन देऊन या प्रसंगीं अगदीं भिऊं नये असं सांगितलं आहे. पण मनाला कुठं तितकं धैर्य आहे. जालंधरनाथांना खाईंतनं वरती काढण्याची वेळ जसजशी जवळ येत चालली, तसतसं हें मन अधिकाधिक भयग्रस्त होऊं लागलं आहे.—

( चाल—या कोणि वाली जगीं निराळीं )

**जडली असे ही किती तरी या मनास दुर्बलता ॥**
**जणुं वालुकामय पर्वत तितुकी मनोरथा दृढता ॥**
**आश्वासिलें मन परोपरीनें देउनियां बहु धीर ॥**
**परि उभारितें शतसंशयमूलक कुकल्पनामंदीर ॥**

—मला इतके दिवस मोठं आश्चर्य वाटत असे कीं, महान् ब्रह्मनिष्ठ सिद्ध पुरुष, कसाहि प्रकारच्या मोहविषादजनक प्रपंच विषयांत ठेवले, तरी त्यांचीं मनं विकृत न होतां, पाण्यांतील कमलपत्राप्रमाणं त्यांत त्यांना आलिप्तपणानं कसं राहतां येतं ? पण तें बरोबर आहे. हा सर्व पसारा क्षणभंगुर आहे, ही केवळ भासमय माया आहे, अशी त्यांच्या मनाची सप्रत्यय खातरीच दृढाभ्यासानं पटलेली असल्यामुळं त्यांच्या ठिकाणीं या सर्वांविषयीं उदासीनता सहज असते. मीच पहाना; कानिफनाथांच्या सहवासानं परमार्थज्ञानाच्या गोष्टी अलीकडे नित्य ऐकायला मिळतात त्यामुळं प्रपंचाविषयीं थोडथोडा विरक्त होऊं लागलों आहें. आणि जालंधरनाथांना खाईंतनं बाहेर काढल्यानंतर त्यांच्या प्रबुद्ध होणाऱ्या क्रोधाग्नीनं आपलं काय होईल ही जबरदस्त भीति एकीकडे मनाला बळकट धरून राहिली असल्याकारणानं, ती विरक्तता आपोआप अधिकाधिक दृढावत चालली आहे. आतां भोंवतालच्या ऐहिक गोष्टींविषयीं चित्तवृत्ति पहिल्या इतकी लोभावत नाहीं. केवळ निर्वाहक्रिया घडिवण्या इतकीच चंचलता या शरीरांत राहूं लागलेली दिसते. जालंधरनाथ आणि मच्छिंद्रनाथ यांच्यासारख्या महासिद्धांचा अनुग्रह जर मजवर खचित व्हायचा असेल, तर तो होण्याची पात्रता याच क्रमानं येणार हें खचित. कारण—

( चाल—कपोला कपोलास. )

**विना देह अनुताप तापें अधीं ॥ न तापे तरी मुक्त नोहे कधीं ॥ मुमुक्षुत्व अंगीं विना बाणतां ॥ घडे लाभ गुरुचा न तो तत्वतां ॥ कृपादृष्टि त्यांची सुधावृष्टि ती ॥ करी पाप-संतापभयनिष्कृती ॥ अहंकार ममता न कांहीं उरे ॥ विदे-हित्व देहींच तें संचरे ॥**

——पण या वेळीं जशी मला आपल्या मनाची ही सिद्धि केवळ शब्दांनीं सहज सांगतां आली, तशी ती सद्गुरुकृपेनें ज्या दिवशीं खरोखर होईल, तोच खरा धन्य दिवस; त्या दिवशींच त्या नरजन्माचें खरें सार्थक; आणि जन्म-मरणापासून खरोखर मुक्तिही तीच. तोंपर्यंत—

( चाल—मति ही निमाली कालिं या. )

**शांति मनाची होइना ॥ भयशंका जाइना ॥ मना० ॥ द्यावा किती तो धीर तयाला ॥ स्थिर मुळिं जें राहिना ॥ मना० शांति० ॥**

( पडद्यांत " अहलख " शब्द होतो. )

—( पाहून ) अहाहा ! हेच ते मछिंद्रनाथ !—

( मछिंद्रनाथ, गोरख, कानिफ येतात. )

—साई महाराज, हा एक संसारप्रवाहपतित आणि कृतापराधव्यथित पामर आपल्या चरणीं विनम्र आहें. (पायां पडतो. )

**मछिंद्रनाथ**—बच्चा कानिफ, यह कौन है. और इतना उदासी और रंजिदा क्यौं है ?

**कानिफनाथ**—गुरुमहाराज, यही वो राजा गोपीचंद है. कृतकर्मके अनु-तापसे बडा लाचार होकर आपको सरन आया है. इसकी माता मैनावती जिसपर गुरु जालंधरनाथका बडा अनुग्रह हुवा है उसकी ओर अब आप दृष्टि लगाकर इसपर कृपा करनेकी बिनती मय आपके चरनोंके पास करता हूं.

**गोरख**—( गोपीचंदास. )—क्या, तूंनेही हमारे गुरूको खाईमें फेंक दिया ?

**गोपीचंद**—होय; याच अधमाधमाकडून तो महदपराध घडला आहे.

**गोरख**—अए मगरूर, गुरु जालंधरनाथनें तेरा क्या गुन्हा किया था ?

**गोपीचंद**—कांहींच नाहीं, पण माझ्या मात्र पापी मनानं त्यांच्याविषयीं भलताच संशय घेऊन मजकरवीं असा अपराध घडविला आहे. आतां मला या सर्व गोष्टीचा पूर्ण पश्चात्ताप झाला आहे !

**गोरख**—अरे नादान, तेरे कुसूरसे गुरुनाथजीको जो उपाधि उठाना पडी ओ अब इस तेरे पश्चात्तापसे पीछे थोडी लोट सकती है !

**मछिंद्रनाथ**—हां बराबर . गोपीचंद—

( चाल—न दावी स्वबाष्पाप्रती संप्रती. )

**क्यंवरे सताया गुरूको वृथा ॥ अब हमसे ऐसी क्षमा चाहता ॥ निकला हुवा तीर फिर ना फिरे ॥ तुझे रंजऽगर हो तो हम क्या करें ॥**

—छोड, बच्चा छोड; मेरा चरन छोड दे !

**गोपीचंद**—महाराज, अपराधांची क्षमा झाली आहे असं आपल्या मुखानं ऐकल्यावांचून आतां हे चरण मी मुळींच सोडणार नाहीं. कारण कृतदोषाबद्दल मला जें शासन व्हायचं आहे तें भोगायला सद्गुरुचरणासारखं पवित्र ठिकाण दुसरं कोणतं असणार बरं ? या चरणांच्या सान्निधच काय मला शासन व्हायचं असेल तें होऊं द्यावं.

**मछिंद्रनाथ**—अरे बेटा; तूने अपराध किया है जालंधरनाथका और क्षमा चाहता है मेरे तरफसे ? यह कैसा होगा ! किस हिसाबसे मय तुझको क्षमा करूं ? अगर मैंने तुझको क्षमा कीं, तोभि जालंधरनाथके क्रोधसे तूं कैसा बचेगा, बेटा ?

**गोपीचंद**—सांई महाराज, आपण दोघेहि एकरूपच आहां.—

( चाल—पडे कां हां तरुण तुरंगांत. )

**नसे कांहीं भेद उभयांत ॥ त्या ब्रह्मस्वरुपांत ॥ समरस तुह्मी सारखेच जणुं जलबिंदु जलौघांत ॥ नसे० ॥ गुणाकृतीनें भिन्न दिसाते जरि हरिहरविधि हे तीन ॥ महत्तत्व जें दत्त-स्वरूपीं एक असाति ते त्यांत ॥ नसे० ॥**

—याकरितां आपली कृपादृष्टी असली म्हणजे जालंधरनाथांचीहि ती मग सहज होणार आहे.

**मच्छिंद्रनाथ**—तो क्या बेटा मृत्युभयसे तूं डरता है ? अरे यह जीवदशामें जो तूं आया है तो तेरेको यकनायक दिन मरना अवश्य होगा.

**गोपीचंद**—सांई, तें मी जाणून आहें. पण परमेश्वरकृपेनं प्राप्त असलेल्या या ऐश्वर्यसुखाचा मी अद्यापि पूर्ण उपभोग घेतला नाहीं; याकरितां तो घेऊन मग योग्य वेळीं मृत्यूला अनुसरावं असं मला वाटतं, दुसरं कांहीं नाहीं.

**मच्छिंद्रनाथ**—अरे बेटा—

( चाल—गड्यांनो कृष्ण गडी अपुला. )

**गाफिल मत ऐसा रहेना ॥ भरोंसा तनका नहिं करना ॥**
**किसीको साथी नहिं गिनना ॥ अकेला तुझको है जाना ॥**
**नहिं इस दुनियामें फसना ॥ यह सब दिखता है सपना ॥**
**दिलको काबूमें रखना ॥ तनका सार्थक कुछ करना ॥ गा० ॥**

**गोपीचंद**—फार उत्तम आहे. तर मग ही पहा, मृत्यूची भीति मी पार सोडून दिली. पण वास्तविक पाहतां अशा प्रसंगीं मी मृत्यूला भ्यावं तरी काय म्हणून बरं ? अहो—

( दिंडी. )

**मृत्यु जरि हा सत्करें असा येतां ॥ तेंवि सद्गुरुचरणाब्ज-**
**लीन होतां ॥ मोक्षदायी होईल सत्य मातें ॥ व्यर्थ भ्यावें**
**मीं काय म्हणुनि त्यातें ॥**

**मच्छिंद्रनाथ**—शाबास बेटा. तेरा मन इतना शुद्ध हुवा है तो अब तुझको कुच्छ डर नहीं. चलो, अब जिस कुवेमें हमारे भाई जालंधरनाथ हैं उसीके पास जाकर उनको शीघ्र निकालें.

**गोपीचंद**—चलावं. कानिफनाथांच्या आज्ञेप्रमाणं त्या ठिकाणीं सर्व सिद्धता ठेविली आहे. ती पहा.

( देखावा—कांठाशीं भिंत व भोंवतीं पायऱ्या असलेली मध्यें खाई असून तीन बाजूंला तीन पुतळे ठेविले आहेत.—**पात्रें**

मैनावती, प्रधान, रूपक्या, अतिशयोक्ति वगैरे उभीं आहेत. )

**प्रधान**—( पुढें येऊन ) महाराज, सेवकजनांकडून आज्ञेप्रमाणें खाईचं तोंड स्वच्छ मोकळं करून टेवलं आहे.

**मछिंद्रनाथ**—अच्छा तो बेटा गोपीचंद जा. पहेले ताम्रके पुतलेके पास खडा रहकर साईनाथको आदेस कहेकर पुकार.

**गोपीचंद**—( पुतळ्या जवळ जाऊन )–सांई महाराज, आदेस.

**जालंधरनाथ**—( आंतून ) कौन आदेस कहेता है !

**गोपीचंद**—मी बंगाल देशाचा अधिपति सुंदरपूर शहरचा राजा गोपीचंद आहें.

**जालंधरनाथ**—अरे अधम पापी चंडाल, तूं जलबलके खाक हो जा !

( पुतळा जळतो. गोपीचंद भिऊन मागें सरतो. )

**गोरख**—( एकीकडे )–" बंगालका अधिपति और सुंदरपूरका राजा ! " सुनो कानिफनाथ कैसी अहंकार की बोली थी !

**कानिफ**—पर गुरुनाथके कोपानलसे उसीकी पुरी रच्छा हो गई !

**मछिंद्रनाथ**—सुन बेटा, अब रजतके पुतलेके नजदीक खडा रहे. और आदेस कहकर साईनाथको पुकार. डरना नहीं हां.

**गोपीचंद**—( तसे करून )–साईमहाराज, आदेस !

**जालंधरनाथ**—( आंतून ) कौन आदेस कहेताहै ?

**गोपीचंद**—त्रिलोकचंद महाराजांचा पुत्र मी गोपीचंद आहें.

**जालंधरनाथ**—जारे पापी, तूं जलबलके खाक हो जा !

( पुतळा जळतो; गोपीचंद भिऊन मागें सरतो. )

**गोरख**—( एकीकडे )–धीरे धीरे रास्तेपर आ रहा है.

**कानिफ**—तोभि बिना पूर्ण निरहंकार बने सद्गुरुका कृपानुग्रह होनेका अधिकार न आयेगा.

**मछिंद्रनाथ**—अब बेटा सुवर्न पुतलेके समीप खडा होकर आदेसयुक्त पुकार. साईनाथका क्रोधाग्नि शांत करनेका यही मार्ग है.

**गोपीचंद**—साईमहाराज, आदेश !

**जालंधरनाथ**—अब कौन आदेश कहेता है ?

**गोपीचंद**--मी गोपीचंद आहें.

**जालंधरनाथ**—तूं गोपीचंद, मेरेश्रापसे जलकर खाक होजा !

( पुतळा जळतो. गोपीचंद भिऊन मागें सरतो. )

**गोरख**—हां ये बख्त सिर्फ 'मी' इतनाहि अहंकार था; पर वहभि खाक होगया.

**कानिफ**—बराबर; शुद्ध गुरुनिष्ठामें तनकभि अभिमान रहेना ठीक नहीं.

**मैनावती**—( गोपीचंदाला सांवरून ) अगबाई !

( साकी. )

**पहा ताम्ररजतस्वर्णांचे तीनहि पुतळे पेसे ॥ गुरुक्रोधजाग्नि निळें जळले कार्पासराशि तैसे ॥ नकळे काय कृपा ॥ करि- तिल रक्षायास नृपा ॥**

**मछिंद्रनाथ**—माई, तूं चिंता न कर. गोपीचंद, अब खुद तूंहि खाईके अंदर सर झुकाकर साईनाथको आदेस कह पुकार.

**रूपक्या**—( एकीकडे गोपीचंदास )–हां हां महाराज, जाऊं नका पुढं. त्यांचं काय ऐकतां. जसा युक्तीनं कांटा काढावा तशी योजना असेल ही !

**प्रधान**—आमचीहि म्हटलं महाराज तीच विनंति आहे. एका क्षणार्धांत ह्या पुतळ्यांची रक्षा होऊन गेली, हें प्रत्यक्ष समोर पहात असतां आपल्याला असं साहस करूं द्यायला आमचं मन कसं बरं सांगेल ! ऐकावंच आम्ही काय म्हणतों तें.

**अतिशयोक्ति**--आम्हीहि विनंति करतों कीं प्रधानजींचा विचार महारा- जांनीं ऐकावा आतां. एवढे हे जड धातूंचे तीन पुतळे पण कायगवाई एखाद्या सुक्ष्म वस्त्राप्रमाणं सहज जळून गेलेले धडधडीत सर्वांनीं आतां पाहिले आहेत. तेव्हां साई महाराजांच्या क्रोधाग्नीची तीव्रता अद्यापि प्रलयाग्नीपेक्षां जास्त आहे असं जर मी म्हटलं तर तें केवळ अतिशयोक्तीचं असं मानून आपण त्याकडे खचित दुर्लक्ष करणार नाहीं !

**गोपीचंद**—काय म्हणतां ! गुरुवचनावर अविश्वास ठेवूं, आणि तुमच्या सांगण्याला मान देऊं ? वाहवा. चांगला उपदेश हा ? अहो—

( चाल—आशि ही सुगुणखनि देई. )

**न धरूं कसा गुरुवचनीं भरंवसा ॥ पात्र तुम्हां करुं दृढ- विश्वासा वचनीं भरंवसा ॥ वदे सुनृत हरिनामनिरत नित पवित्र पीयुषसार ॥ अशा रसनेंतूनि वचनें निघतिल काय असार ॥ समजोनी कशी ती न मानूं विमूढ बनोनी ॥ गुरूच्या वचनीं भरं० ॥**

**मछिंद्रनाथ**—क्या बेटा गोपीचंद, फेर तेरेको शंका और डर तो नहीं उत्पन्न हुवा ?

**गोपीचंद**—नाहीं महाराज. शंका, भीति आणि अभिमान या तिन्ही विकारांची रक्षा या तीन पुतळ्यांच्या बरोबरच या ठिकाणीं झाली आहे. हा पहा आतां केवळ गुरुनिष्ठ शुद्ध अंतःकरणाचा आपला शिष्य आपल्या आज्ञेप्रमाणें त्या खाईजवळ जाऊन साईमहाराजांना आदेश करतो आहे.

**गोरख**—( एकीकडे )—इतना पाक हुवा होय तो तुं गुरुनाथकी कृपासे अब खाक नहीं हो जायगा.

**गोपीचंद**—साईमहाराज आदेस !

**जालंधरनाथ**—( आंतून ) अरे बार बार कौन आदेस कहेता है ?

**गोपीचंद**— हा सद्गुरुचरणीं लीन असा मैनावतीचा पुत्र गोपीचंद आहे.

**जालंधरनाथ**—कौन कहा ? गोपीचंद ?

**गोपीचंद**—होय तोच गुरुनाथांचा एक महदपराधी.

**जालंधर**—क्या अबतक तुं जिंदा है बेटा ?

**गोपीचंद**—नाथ माहाराजांच्या कृपेमुळं जिवंत आहें.

**जालंधरनाथ**—आच्छा; तो उसी कृपासे अब तू चिरंजीव हो जा !

( सर्वजण आनंदित होतात. )

**मैनावती**—( गोपीचंदाला प्रेमानें पोटाशीं धरून )—धन्य धन्य झालास बेटा तूं.—

( चाल—रंगिले रसिले छबितोरि. )

**तव हें मुख ये कुरवाळूं दे ॥ कवटाळूं दे अशी ॥**

जणुं फिरुनि नव सुत सुख हें मिळे ॥ ये तव० ॥

... ... ...

**गोपीचंद**—( नम्रपणानें )—

अर्थसिद्धिसाधक तनुचो ॥ प्राप्ति ही कृपा मुळिं तुमची ॥
भेटहि तिजला वरि करवोनी सद्‌गुरुची ॥ अचल अमर-
पदिं धन्य होय जगतामधें ॥ ... ...

**मैनावती**—

... ये तव हें मुख ये कुरवाळुं० ॥

**कानिफ**—( खाईजवळ जाऊन )—गुरुनाथ, मय कानिफ आदेस कहेता हूं !

**जालंधरनाथ**—( आंतून )—आदेस !

**गोरख**—मय गोरखभि आदेस कहेताहूं.

**जालंधरनाथ**—आदेस !

**मछिंद्रनाथ**—सांई; मय मछंदरनाथ आपके दर्सनके लिये यहां खडा हूं.

**जालंधरनाथ**—कौन ? मेरा भाई मछंदर ?

( सर्व ' अहलख ' करतात. त्याबरोबर चहूंकडे प्रकाश पडून जालंधरनाथ खाईतून अधर वरतीं आलेले दृष्टीस पडतात. )

**सर्वजण**—( जालंधरनाथावर पुष्पवृष्टि करीत )—

( चाल—हाय हाय हाय ॥ मे बेचारी दुःखीप्यारी. )

शांत शांत शांत ॥ महदपराधो धरुनि कुबुद्धी आम्हि अघ-
निधो दिली उपाधी न व्हा पराधो ॥ शांत० ॥ सद्‌गुरुनाथ
सद्‌गुरुनाथ ॥ हा प्राणिपात हा प्राणिपात ॥ क्षमा करावी ॥
शांति वरावी ॥ क्षुब्ध हृदय वृत्ति स्थिर व्हावी ॥ कृपादृष्टि
या जनीं असावी ॥ वत्सलता दृढ मनीं वसावी ॥ शां० ॥

( जालंधरनाथांना त्यांचा हात धरून मछिंद्रनाथ पुढें आणतात. मागील सर्व देखावा बंद होतो. सर्वजण पायां पडतात. मैनावती पुष्पहार घालते. )

**मैनावती**—गुरुमहाराज, दासीची चरणापाशीं एक विनंति आहे आतां.

**जालंधरनाथ**—वो क्या ?

**मैनावती**—महाराज,—

( चाल—मन्नेत्र गुंतले लुब्ध झाले. )

**अपुल्या कृपाकरें ॥ वांचवीलें ॥ संकटीं जसें ॥ भुवनांत या अतां ॥ धन्य केलें ॥ पाहिजे तसें ॥ मुक्त करा पूर्ण त्याला ॥ भवचक्रातूनि या ॥ मु० ॥**

**जालंधरनाथ**—सुन माई, जब तेरा बेटा नाथदीक्षा धारन करेगा तब तेरा यहमि खियाल पूरा हो जायगा.

**मछिंद्रनाथ**—सत् है. मनसे और तनसे बिना जोग लिये जन्ममरनरूप इस संसारसे मुक्त होना असाध्य है.

**गोपीचंद**—मग महाराज या गोष्टीला आतां विलंब कशाला बरं—

( चाल—माझें हृदय पोळत धैर्य गळत. )

**या कश्मलयुत भवजलधित कां निपतित मजासि पाहतां ॥ ॥ या० ॥ अनुतापें चित्तशुद्धि आधिं जाहली ॥ पूर्ण विरक्त स्थिति ही मग ठसावली ॥ सद्गुरुची सदय शांत मूर्ति भेटली ॥ मग कां भयविमुखा परम सुखा मज त्या मुकवीतां ॥ या० ॥**

**जालंधरनाथ**—अच्छा तो चलो. भाई मछंदर जोगदीक्षा लेनेवालोंको किस तयारीसे रहेना चाहिये यह इसको बतलाइये.

**मछिंद्रनाथ**—अच्छा, सुन गोपीचंद,—

( चाल—घोर संसार तरु मुग्ध कोरक. )

**आस सबकि छोड ॥ बिखयज मोह तोड ॥ देहममता फोड ॥ जोड तूं ब्रह्मसे ॥ आ० ॥ निश्चलासन उपर ॥ बैठकर ध्यान धर ॥ मंत्र पढ दिगंबर ॥ अमर कर आपको ॥ आ० ॥**

**गोपीचंद**—( नम्र होऊन )—गुरुमहाराज—

( चाल—पूर्वी अधरोष्ठावरी सखिच्या. )

**उपदेशाक्षर वचनें अपुलीं शिरसा आदरिलीं ॥ वज्रलिपी-परि हृत्पटलावरि मुद्रितशीं ठरलीं ॥ तापत्रयतप्तावरिं वृष्टी अमृताची झाली ॥ त्रैलोक्यींच्या साम्राज्याची माळ गळां पडली ॥**

( सर्व जातात. )

---

## प्रवेश दुसरा.

**स्थळ**—बाग.—**पात्रें**—मोहनाराणी व चंपावती झोंपाळ्यावर बसल्या आहेत व दासी त्यांना झोंके देऊन पुढील गाणें म्हणताहेत, नाचताहेत असा देखावा.

**सर्व दासी**—

( चाल—जिवलग प्रिया नका जाउं थांबा. )

**परिजन मिळे सभोंवार खेळे ।। हलवित झोले सदा डुले ॥ कुणि गुंफित राही तिथें फुलें ।। कुणि सादर सेवेमधें झुले ।। कुणि नटूनि थटूनि पहा खुले ॥ जेंवि सखिसह देवि गौरी विहरतांना शोभली ॥ तेंवि येथें कौतुकानें उभयतां हीं बैसलीं ।। करूनि गायन ॥ तसेंच नर्तन ।। विनोद भाषण ।। प्रसन्नवूं मन ॥** ( नाचत ) **छुं छननन छुं छननन छुमछुम छनन छुमछुम छननन छुं छुं ॥ छुछुछुम छा, छुछुछुम छा, छुछुछुमछा ॥ परि० ॥**

**मोहनाराणी**—( चंपावतीस ) वन्सं तुम्ही तरी दोन दिवस आपल्या सासरनं इथं आला आहांत, त्यामुळं तितकीच म्हटलं करमणूक होतेय ही.

**चंपावती**—मी येऊन उपयोग काय ? दादाच्या भेटीकरितां मी इथं आल्यें, पण आज कित्ती दिवस झालें; एका शहरांत, एका वाड्यांत असून आमची भेट नाहीं.

**मोहनाराणी**—तुम्ही किती दिवसच म्हणतां, पण मी म्हणत्यें किती महिनेसुद्धां झाले असतील. महालाकडे येणंच टाकलंय अगदीं! सदां पहावं तर आपल्याशीं एकांत आणि उदास स्थितींत असायचं. ही वृत्ति अलीकडे बाई फारच वाढत चालली आहे. शेवटीं मेली अजिबात संसारांतनं उठायला तिकडे लावील कीं काय अशी मला भीति वाटते.

**चंपावती**—चल वहिनी, काय भलतंच मनांत आणतेस हें! माझा दादा कांहीं इतका वेडा नाहीं.

**मोहनाराणी**—इकडून नसायचंच कोणी वेडं. म्हणेल कोण? पण भोंवतालचीं सगळीं माणसं, आन् त्यांतनंहि सासूबाईसारखीं मायेचींच माणसं जर बळं एकेक वेड लावूं लागलीं, तर मग काय करायचं आहे?

**चंपावती**—आईसाहेबांनीं तें कायग केलंय असं?

**मोहनाराणी**—मूळ प्रथम जालंधरनाथांच्या भजनीं तर त्याच लागल्या होत्या.

**चंपावती**—मग त्यांत काय वाईट झालं? त्यांचा सर्व संसार झालेला आहे. आतां त्यांचं लक्ष इकडे प्रपंचांत न राहतां कुणा तरी सद्गुरूच्या अनुग्रहानं परमार्थाकडे लागेल तितकं बरंच; नाहीं का?

**मोहनाराणी**—होय. त्यांना कुणी प्रतिबंध केला होता? पण आपल्या प्रमाणंच त्यांनीं इकडचंहि मन विरक्त बनविण्याचा प्रयत्न केला, आणि आमचा संसार सारा व्हायचा राहिला असतां, आम्हांला अवेळींच तो साफ अंतरविण्याचा प्रसंग आणला आहे! वन्सं—

( चाल—सुध बिसरगइ आज )

**अझुनि तरि संसारसुख पाहिलें काय ॥ इतुक्यांत निःसार म्हणुं समज हा काय ॥ अ० ॥ परमार्थि अधिकार व्हायास सदुपाय ॥ भोगाविण विकार उपशमतील काय ॥ अ० ॥**

( रूपक्या व अतिशयोक्ति भांडत येतात. )

**रूपक्या**—चल हो पुढं. हो पुढं; आतां कां नागिणीसारखी फुसफुसतेस? जोगीण ना माझ्याबरोबर बनणार आहेस तूं? चल तर मग; पण तसं कशाला;



**मोहनाराणी:**—( रा. विष्णुपंत पागनीस. )

" मी सांगूं ? आन् मग तूं काय सांगायला आला आहेस तें ? "

[ पृ. ६७

ह्या पहा इथं, जशा कांहीं गंगा–यमुना किंवा लक्ष्मी–पार्वती, तशा आमच्या राणीसाहेब आणि ताईसाहेब बसल्या आहेत. त्याच न्याय करतील आपला.

**मोहनाराणी**––रूपक्या, काय चाललं आहे तें, तुमचा नेहमींचाच आपला विनोद आहेना ?

**रूपक्या**––( अतिशयोक्तीस )–हं सांग आतां.

**अतिशयोक्ति**––मी नाहीं; म्हटलं आपणच सांगायचं होतं.

**रूपक्या**––बरं आहे. मी सांगतों. हं राणीसाहेब, तुम्हीच आतां सांगा बरं ?––

**मोहनाराणी**––मी सांगूं ? आन् मग तूं काय सांगायला आला आहेस तें ?

**रूपक्या**––तसं नव्हे, आमचा तंटा ऐकून मग तुम्ही त्याचा न्याय सांगा, असं माझं म्हणणं !

**मोहनाराणी**––बोल तर काय तें.

**रूपक्या**––हें पहा, मी म्हणतों जशी न्यायाधिशाची बायको न्यायाधिशीण, कोशाधिपतींची बायको जशी कोशाधिपतीण, सैन्यांतला नायक असतो त्याची बायको जशी नायकीण––

**चंपावती**––नायकीण !

**रूपक्या**––ऐका तर खरं. प्रजाजनांतल्या एखाद्या उत्तम कसबी मनुष्याची बायको जशी कसबीण––

**मोहनाराणी**––मेल्या बडबडतोहेस तरी काय हें ?

**अतिशयोक्ति**––राणीसाहेब, हा रूपकांचा प्रकाश पडत असून त्यानं भाषेच्या सर्व पोक्तपणाला आग–नव्हे उजळा–लावून देण्याचं चालवलंय हें !

**रूपक्या**––बरं बरं. त्यांत आणखी अतिशयोक्ति नको आहे !

**मोहनाराणी**––हाच का तुमचा तंटा; आन् याचा का न्याय निवडून घ्यायला माझ्या पुढं असे भांडत आलात हें ?

**रूपक्या**––तसं नव्हे; पण जशी शिक्षकाची बायको शिक्षकीण, ज्योतिष्याची बायको ज्योतिषीण, हरदासाची बायको हरदासीण, संन्या––

**चंपावती**––संन्याशाची !

**मोहनाराणी**–( दासींना )–घाग मेल्याच्या चांगली तोंडांत; वात्रट कुठला !

**दासी** ( रूपक्यास )–संन्याशाला बायको असते कायरे.

( त्याला मारायला जातात. )

**अतिशयोक्ति**–( दासींना आडवून ) हां खबरदार; माझ्या समक्ष आंगाला तुम्ही ग कोण हात लावणार !

**मोहनाराणी**–मग आमच्या समक्ष तूं देणार का आपल्या नवऱ्याच्या तोंडांत, त्याच्या अशा वात्रटपणाबद्दल ?

**चंपावती**–आहे वाटतं नित्यांतला परिपाठ ?

**रूपक्या**–पण कुणीच एवढी तसदी घेऊं नका कशी. आपलं गाऱ्हाणं उदाहरणांनीं नीट पटवून सांगण्याच्या भरांत बोलण्यांत चुकलों म्हणून मीच आपल्या तोंडांत मारून घेतों ही ! झालं ? पण आमच्या तंट्याची गोष्ट राहिलीच.

**मोहनाराणी**–सांग तर मग नीट ती.

**रूपक्या**–माझं म्हणणं असं कीं, न्यायाधिशीण, ज्योतिषीण, हीं जशीं त्यांच्या बायकांचीं नांवें असतात, तसं मी आतां जोगी बनलों म्हणजे हीं माझी बायको अर्थात् जोगीण नाहीं का होणार ?

**अतिशयोक्ति**–नांवानं नुसतं म्हणेनात कुणी मला तसं; पण मी आपलं चांगलं चोळी लुगडं नेसायचं आन् दागदागिने घालायचं टाकून तुमच्या बरोबर भगवं पटकुर लावून झोळी घेऊन भिक्षा मागायला नाहीं दारोदार यायची ! तुमच्याच दाखल्याप्रमाणं कां होईना, मी म्हणत्यें कीं न्यायाधिशाची बायको न्यायाधिशीण असते, म्हणून न्यायसभेमध्यें त्याच्याबरोबर जाऊन न्याय का करीत बसते; किंवा सेनापतीची बायको सेनापतीण झाली म्हणून ती ढाल तरवार बांधून लढाईवर का जात असते ?

**चंपावती**–बरोबर आहे हिचं म्हणणं हें.

**रूपक्या**–मग आम्ही मात्र आंगाला राख फांसून गांवांत भिक्षेला जावं, आन् हिनं—

**अतिशयोक्ति**—चांगलं चोळी लुगडं नेसून आणि घरांत बसून आपण भिक्षा आणाल त्यावर खुशाल संसार करावा !

**रूपक्या**—वः, हा काय न्याय झाला !

**अतिशयोक्ति**—आन् मग घरदार बायकामुलं असा चांगला संसार असतां तो बळं सोडून भिकार जोग घ्यावा हा तरी न्याय झाला का ?

**चंपावती**—पण देवाच्या दयेनं संसार चांगला अनुकूल असतां जोगी होण्याचे हे भिकार डोहाळे कां ?

**मोहनाराणी**—बरोबर म्हटलंत; जोग कुणी घ्यावा—

( चाल—प्रणयतरंगासवें. )

**सुलभ भोग ज्या नसे ॥ उचित जोग त्या असे ॥ निर्धनें**
**निर्गुणें प्रभुपणांत राहणें ॥ जरि न येइ मिरवणें ॥ सुल० ॥**
**जवळि सुख न ज्या दिसे ॥ दूर चिंतुनी असे ॥ प्रेम हृदयिं**
**नाहिंसें ॥ त्यांत विरतता वसे ॥**

**चंपावती**—आणखी मी म्हणत्यें कीं, परमार्थंच साधण्यासाठीं जोग घ्यायचा असेल तर संसारांत राहूनहि तो साधतां नाहीं का येणार ?

**अतिशयोक्ति**—पण बाईसाहेब, मेंढी हुरळून जशी लांडग्याच्या मागं लागावी, किंवा मोर नाचतो म्हणून लांडोरहि नाचावी, त्यांतले इकडचे चाळे आहेत हे !

**मोहनाराणी**—म्हणजे !

**अतिशयोक्ति**—तिकडे महाराजांनीं जोग घेण्याची तयारी केली ती पाहून हीहि स्वारी आंगांतले कपडे फाडूं लागली !

**मोहनाराणी**—( घाबऱ्यानें उठून )—अगबाई, काय म्हणतेस. तिकडे आतां जोग ही घेणं झालं ?

**चंपावती**—काय, माझ्या दादानं आज जोग घेतला ?

**अतिशयोक्ति**—होय ताईसाहेब, आत्तांच मासाहेबांच्या विनंतीवरून जालंधरनाथांनीं त्यांना जोगी बनवलं. महाराजांनीं आंगावरलीं सर्व उंची वस्त्रं आणि रत्नालंकार काढून आंगाला राख फांसली आहे, कौपीन चढवून कफनी

घातली आहे. नाथदीक्षेप्रमाणें शैलीशृंगी धारण केली आहे. ते आतां या जोगी वेषानं शहरांत भिक्षेसाठीं निघून फिरत फिरत आपल्या महालाकडेहि येणार आहेत.

**मोहनाराणी**—झालं बाई ! वन्सं मला भीति होती तीच अखेरीला खरी ठरली !—

( चाल—अहा प्रभो काय अशी. )

**ऐकियलें शेवटिं मी काय बाइ हें असें ॥ कल्पनेंहि ज्याच्या ॥ भिवविलें मनाला ॥ अप्रिय तें प्रत्ययास आज पहा येतसें ॥ ऐकि० ॥**

**चंपावती**—वहिनी, काय सांगूं तुला मी. अग—

( चाल—जलभृत मेघध्वनिसम हा. )

**किति हौस धरुनि मीं आल्यें ॥ भेटाया प्रिय बंधुस परि हें अप्रिय ऐकियलें ॥ मन कुंठित होउनि गेलें ॥ कांहिं सुचेना काय करूं गे ऐसें मज झालें ॥ किती० ॥**

**अतिशयोक्ति**—ही आमची स्वारी देखील त्यांच्याचबरोबर मग जोगी बनून निघायला तयार झाली होती; पण मी हट्टानं आडवून इकडे घेऊन आल्यें यांना.

**मोहनाराणी**—गडे वन्सं, मीहि त्यांना असंच आडवून इकडे घेऊन येऊं का ? माझं ं कायचं होईल ? वन्सं तुम्हीहि आहांत या वेळीं चार गोष्टी सांगून मन वळवायला. चला, म्हटलं जाऊं या तिकडे.

**चंपावती**—पण आतां जाऊन काय उपयोग. योगदीक्षा तर धारण केलीच आहे. आतां इथं गांठ पडल्यावर कांहीं सांगून मन वळवतां आल्यास पहावं.

**मोहनाराणी**—( अतिशयोक्तीस ) कायग, तूं म्हटलंस स्वारी इकडे येणार आहे, खरं ना ?

**अतिशयोक्ति**—होय. या योगदीक्षेबद्दल जालंधरनाथांनीं महाराजांजवळ दक्षिणा हीच मागितली आहे कीं, त्यांनीं आतां सर्व शहरांत आणि महालांतल्या स्त्रियांकडे भिक्षेला निघून जी भिक्षा मिळेल ती गुरुदक्षिणा म्हणून त्यांस द्यावी.

महाराजांच्या या भिक्षेचा आरंभ मासाहेबांच्या महालापासूनच झाला आहे. महाराजांना अशा विरक्त मार्गाला लावण्याचा सर्व मूळ प्रयत्न जरी मासाहेबांचाच होता तरी आपल्या राजविलासी पुत्रानं तो भिकारी जोगवेष घेतलेला पाहून त्यांच्या डोळ्यांतनं खळखळां अश्रुधारा वाहूं लागल्या! महाराजांच्या झोळींत भिक्षा घालतांना त्यांचे हात थरथरां कांपूं लागले! दोघं सद्गदित झालीं! उभयतांच्या मुखावाटे एक शब्द निघेना! शेवटीं जालंधरनाथांनीं निष्ठुरपणानं ओढल्यामुळं महाराज कसे तरी तिथनं निघाले; पण त्या वेळीं तिथं मागं सर्वांच्या मनाला एकदम विलक्षण कांहीं धक्का बसल्याप्रमाणं होऊन मोठाच हाहाःकार उडाला! वाड्यांतले दासदासी, शिपाईप्यादे, मंत्रीमानकरी यांना तर तो प्रसंग पाहून दुःख झालंच; पण काय सांगूं बाईसाहेब, महाराज वाड्यांतनं निघतांच, पिंजऱ्यांतले क्रीडापक्षी, पागेंतले गजतुरंग, बागेंतल्या वृक्षवेली ह्या सुद्धां कष्टी होऊन ढळढळां अश्रु ढाळतांना दिसूं लागल्या! हा भिक्षाविधि संपल्यावर महाराज अशाच वेषानं बारा वरसं तीर्थयात्रेसाठीं जाणार आहेत असं ऐकल्यें.

**मोहनाराणी**—माझा तर बाई हें ऐकून धीरच खचला अगदीं!

**चंपावती**—अशा स्थितींत दादांकडे माझ्यानं आतां पहावेल तरी कसं!

( पडद्यांत " अहलख " शब्द येकूं येतो. )

**अतिशयोक्ति**—अगबाई! आली वाटतं महाराजांची स्वारी इकडे!

**चंपावती**—चल वहिनी; यावेळीं घट्ट मन करून मोठ्या धैर्यानंच प्रसंगाला सादर असलं पाहिजे.

**मोहनाराणी**—चला बाई!—

( चाल—चालु ठाकुरमां जइ वासी. )

**हतदैवा मी वनवासी ॥ पति घेति फकीरी होती उदासी ॥ हतदैवा० ॥ गृहधनदारा विषयपसारा असुनी सुंदर तो सारा ॥ नाहिं अझुनी अनुभवला तों उपजे विरतिच ही कैसी ॥ हत० ॥**

( जातात. )

## प्रवेश ३ रा.

( गोपीचंद फकीरीवेषानें येतो.—स्थळ, महालाचा बाहेरील भाग. )

**गोपीचंद—**

( चाल—जान हमारी अब तनसे. )

**घाबरतें कां अझुनी मन हें कळेना ॥ घाब० ॥ गुरुक्रोधाब्धी जें तरलें ॥ मातृमोहसरिता उतरलें ॥ काय या स्त्रीप्रेमौघा ॥ त्यास लंघवेना ॥ घाब० ॥**

—मला वाटतं मी या मनाची प्रतिष्ठा फार ठेवतों. म्हणूनच तें मला वारंवार भिववतंय असं. चला, आपण आतां त्याचा विचारच करूं नये. गुरुनाथांच्या आज्ञे-प्रमाणं या महालांत जावं आणि भिक्षा मिळेल ती गुरुचरणीं सादर करावी.—

( भजन. )

**दे मोरी मय्या ॥ सुन मोरे भय्या ॥ मुठ्ठीभर आटा रे ॥ करम मेरा छूटा ॥ दे मोरी० ॥ फकिरी मिली मुझे ॥ गुरु साहिबसे ॥ भवभय टूटा रे ॥ करम० ॥ दे मो० ॥**

( मोहना व चंपावती धांवत येऊन गोपीचंदास मिठी मारतात. )

**मोहनाराणी**—प्राणनाथ, आपण काय असं विपरीत केलं हें !

**चंपावती**—दादा, ह्याच कारे वेषानं तुला पाहिला इथं आल्यें ही मी !

**मोहनाराणी**—प्राणनाथ—

( चाल—तनवारिदा )

**वरिलें प्रिया ॥ विरतीस या कां ॥ वरि० ॥ विषयाभिलाषी ॥ तनु ही विलासी ॥ तिजला उदासी ॥ बनवूनियां कां ॥ वरि० ॥ स्वरुपें भिकारी ॥ प्रिय नाशकारी ॥ ममतेस मारी ॥ विरतीस या ॥ कां ॥ वरि० ॥**

**चंपावती**—दादा, असलं खडतर व्रत पत्कारायला तुझं तसं अनुकूल वय तरी झालं आहे कारे ?



**गोपीचंदः**—( रा. केशवराव भोसले. )—

" दे मोरी मय्या. । मुठीभर आटा ॥ "

[ पृ. ७२

**मोहनाराणी**—प्राणनाथ आपल्या विलासी देहाला ही उदासी दीक्षा सहन तरी कशी होईल ?

**चंपावती**—खरंच दादा, अरे—

( चाल—एक चतुर नार कर कर शृंगार. )

**जी जातिकुसुमसुकुमारमृदुल ॥ विधुचीहि कांति तुलनोसि अतुल ॥ तनु कैंवि कठिण हा जोग वरिल ॥ जी० ॥ जशि तप्त हेमगौरांग रुचिर ॥ सुखकेलिभवन वनवासि बनुन ॥ तनु० ॥ जी० ॥**

**मोहनाराणी**—प्राणनाथ, आम्ही आतां कुणाकडे पाहून आपलं आयुष्य कंठावं बरं ? प्राणावांचून कुडी तसं आपल्यावांचून आम्हां सर्वांचं होणार नाहीं काय ?—

( चाल—हूंतो करूंगी हरी संगरा. )

**केलें काय प्रिया भलतें ॥ सलतें हें नयनीं ॥ पाहुनी ॥ के०॥ झालें शून्य खरें जग शोकभरें ॥ रूप विपरित हें न बरें ॥ उलवी हृदया ॥ पाहुनी ॥ केलें० ॥**

**चंपावती**—दादा, परमार्थसिद्धीसाठीं हाच मार्ग कुठून बरं तुला योग्य वाटला ? अरे—

( चाल—मी समजुं तरी काय भुले मन. )

**ती त्यजिलि वद काय शिवें सति ॥ ती ॥ त्य० ॥ प्रकृति पुरुष हा योग अनादि ॥ सर्व जगत्स्थिति सिद्ध तयावरिं ॥ ती ॥ त्य० ॥ वस्तु न सोडी कधिं लागेतें ॥ काय त्याची [illegible] प्रभेतें ॥ उपेक्षुनीया सुखसंसार [illegible] तपादिक ॥ ती ॥ त्य० ॥**

**मोहनाराणी**—प्राणनाथ, आमचा असा घात करूनच काहो यां [illegible] त्याला परमार्थसुख मिळवावंसं वाटलंय हें ?

**गोपीचंद्**—प्रिये ( चपापून )—पण शिव शिव ! नेहमींच्या संवयीमुळं हे काय शब्द माझ्या तोंडांतून निघाले ! गुरुनाथ, गुरुनाथ !—

( चाल—हे हे हे मन तूं काहे जले. )

**हे हे हे मन तूं सावध रे ॥ हे० ॥ श्रवण मनन अभ्यास करुन दृढ वृद्धिस विवेक पावला ॥ तो तूं या समयिं जागिव रे ॥ हे हे० ॥ कोण कुणाची प्रिया आतां ती कोणाचा प्रिय नाथ ही ॥ पूर्विल आश्रम सुटतां तुटलें ॥ पहिलें नातें अपाप सगळें ॥ हे हे० ॥**

**मोहनाराणी**—हा रे कर्मा ! काय मी आपली आतां प्रियाही राहिल्यें नाहीं ? मग आतां एवढं तरी करा म्हंजे झालं.—( पायांशीं बसून )

( चाल—खलबलीने यारो जियरवा. )

**तनु वधूनि आधीं निजकरिं तरि ॥ मुक्तता करावी ॥ अमुची मु० ॥ भीरुदुर्बलादिक धर्में ॥ या भवार्णावतें ॥ तरेल एकली कैंवी ॥ तनु० ॥**

**चंपावती**—दादा, परमार्थप्राप्तीच्या मार्गाला लागतांना, आपलीं आप्तप्रिय माणसं अशींच जर तुडवून जावं लागत असेल, तर एक पाय माझ्याहि आंगावर देऊन जा म्हणत्यें.

( दोघी पायांशीं लोळण घेतात. )

**गोपीचंद्**—हें काय बरं ताई असं—पण नव्हे. हाच तो प्रेमपाश. ( दोघींना झिडकारून )—

( चाल—नयनाश्रूंनीं अभिषेक० )

**मन या मोहें अविकृत तरि तें कैवल्य पावें ॥ वैराग्याची निश्चलता ॥ ज्ञानाची जी पूर्णता ॥ प्रसंग हे या परीक्षणाचे ॥ जाणूनि जावें ॥ मन० ॥**

( जाऊं लागतो. )

**[illegible]ती**—( उठून त्याला आडवून )—दादा मी तुला जाऊं देणार नाहीं !

**मोहनाराणी**—आम्ही म्हटलं आपल्याला असें आडवून धरूं !

**गोपीचंद**—( आपल्याशीं भजन करीत )—

( चाल—उचित नसे भरता. )

**मुक्त दिशा ज्याला ॥ केलें बद्ध कुणी त्याला ॥ मु० ॥ दग्ध-**
**पटाची घडी कधीं ती ॥ उकले कवणाला ॥ केलें० ॥**
**अंकुर येइल काय पेरिल्या ॥ भर्जित बीजाला ॥ केलें० ॥**

**चंपावती**—बरं तर, दादा तुला असं जोग घेऊनच राह्यचं असेल तर ज्याचा व आम्हां आप्तप्रिय माणसांचा असा निष्ठुरपणानं त्याग करून न जातां ंच एखादा सुंदरसा मठ बांधून राहिलास तर नाहीं का चालायचं ?

**मोहनाराणी**—अशाहि स्थितींत आपली रात्रंदिवस सेवा आम्हांला करतां ईल. या कठिण जोगदीक्षेचे कष्ट आपल्या सुकुमार देहाला अगदीं होऊं गार नाहीं.

**गोपीचंद**—( आपल्याशीं )—अहाहा ! गुरुनाथ आपल्या कृपेचा प्रभाव ाय सांगावा !—

( चाल—चिंति मन हें. )

**सर्व हे उपचार सांप्रत निष्प्रयोजन जाहले ॥ गुरुकृपें मज**
**देहविषयक मुळिं ममत्व न राहिलें ॥ भूमि शय्या, भुज उशी,**
**शशिसूर्य दीपक होउनी ॥ दिशा वसनें, शांति वनिता,**
**उन्मनीं सुख या जनीं ॥**

( जालंधर व मैनावती येतात. )

**जालंधरनाथ**—शाबास बच्चा ! देख मैनावती, इस भवसमुंदरके जनम-मरणरूप भंवरेमें आदमीको घुमानेवाला जो मायामोह है, उससे यह तेरा बेटा बेलकुल परे होगया है. अब इसको यह संसारजालका कुछमि डर बाकी नहीं हा. धन्न है बेटा गोपीचंद तूं.

( गोपीचंद पायां पडतो. )

**मैनावती**—ही सर्व सदगुरुमहाराजांची कृपा आहे.

**मोहनाराणी**—पण गुरुमहाराज, प्राणनाथांना अशा स्थि

लावलंत, त्या वेळीं केवळ त्यांच्यावर अवलंबून ज्यांचं जीवित आहे, अशा आम्हां दीनदासीजनांविषयीं कांहींच का विचार आपल्या मनांत आला नाहीं! पति उदासवेषानं वनवासी झाल्यावर मागं आम्हां अबलांची गति काय व्हावी बरं?

**चंपावती**—शिवाय आम्हां स्त्रियांना तरी परमार्थसिद्धीची अपेक्षा मुळीं नसावीच का कांहीं?

**जालंधरनाथ**—हां माई. उस परमार्थ मार्गमें लगनेकी जोग्यता आनेका तुमकोंभि यही एक जरिया क्यों न होगा? अगर ये बख्त तुमपर न गुजरता तो इस बातका तुमको कभि खियालभि न होता. और इसी तरेह दुनियाके ऐश व अशरतके नशेमें हमेशा गाफिल होकर तुम पडे रहेते.

**मोहनाराणी**—पण महाराज, या मूढ दासीचं एक विचारणं आहे, तें असं कीं, ईश्वरी कृपेनं ऐश्वर्यसुखसंपन्न असा आपला असलेला संसार बळंच वैराग्यवृत्तीनं विच्छिन्न करून मग का परमार्थाची प्राप्ति करून घ्यावी लागत असते ती?

**जालंधरनाथ**—ऐसा नहीं है माई. जब इनसान दौलतके पुरे जोषमें रहेताहै तब वो यह नेकरास्ता बिलकुल भूल जाता है. अगर उसको यकायक किसी-वजेसे दिखलाइभि दिया तो वो उसको बेफायदा समझता है. और उसकी चोहोलभि करता है. इसवास्ते ऐसे बेवकूफी और मगरूरीको इसी तरेहके पेंचमें गिरफ्तार करके होषमें लाना जरूर होता है.

**चंपावती**—पण आमचा दादा आतां. आपण नुकताच त्याचा धन्यवाद केल्याप्रमाणं, असल्या मोहविषादजनक प्रसंगांतनं आपल्या कृपेनं मुक्त होऊन योग्य अधिकारी ठरला आहे; होय ना?

**जालंधरनाथ**—हां माई. और इसीवास्ते अब उसको ऐसे फकीरी भेकमें रखनेकी कोई जरूरत नहीं. वो अब मिथिलाधिपति जनकराजाकी तरह गिरस्तीमें रहेकर परमार्थका सुख चखते रहेगा. और आपनी सुसंगतसे तुम ऐसे केवळ बिखयी जनोंकोभि उसी राहकी पहेचान करा देगा. सुन मैनावती, अब जाव, और गोपीचंदको अच्छी तरहसे न्हिलाधुलाकर राजभूखन और जेहवर पेहनाकर ले आव.

**[illegible]चंद**—गुरुमहाराज, मला आतां पुनः या प्रपंचबंधनांत कशाला पडूं

देतां ? आपल्याकृपेनं अनायासानं मी यांतनं मुक्त झालों आहे. आतां याच स्थितींत ही उर्वरित देहयात्रा संपावी हें इष्ट नव्हे काय ?

**जालंधरनाथ**—नहीं, बेटा. यह तेरा खियाल गलत है. जबतक आदमीको देहसंबंध है तबतक प्रपंच उससे हरगीज दूर नहीं हो सकता. क्यों के जिंदगीके लिए हरएकको किसीतोरसे किसीतरेहकी प्रपंचकी निशाणी कायम रखना जरूर पडती है. उसमें लिहाज व खियाल इतनाहि लाजम है के प्रपंचके ख्वाबेखरगोषमें मुबतिला न रहे. और आपने ग्यान दृष्टीको कायम रख्खे.

**मोहना व चंपावती**—( नम्र होऊन. )—

( चाल–पुरा प्रल्हाद. )

**कृपा घडली ॥ घडलि ही भारि ॥ करी आम्हास आभारी॥**
**॥ कृ० ॥ वर्षुनि जीवन जीवनदानें सुवेळि तरुवेली ॥ केलि**
**जशी टवटवीत फिरुनी होतीं जीं सुकलीं ॥ तसें या कालीं॥**
**आम्हाला आलि ॥ सनाथदशा पुन्हा पाहिली ॥ कृ० ॥**

( रूपक्या व अतिशयोक्ति यांच्या शिवाय सर्व जातात. )

**अतिशयोक्ति**—कां, आतां कसा काय बेत आहे ! म्हटलं भोगी का जोगी !

**रूपक्या**—बेत काय ? जो महाराजांचा तो आमचा. बोकडाच्या तोंडाबरोबर जशी त्याची दाढी हालते, तसेच आम्हीहि महाराजांच्या गतीनं चालत असतों.

**अतिशयोक्ति**—शेवटीं पण खरं कुणाचं झालं ? एकंदरींत सर्वांत श्रेष्ठ भोगच ठरला ना !

**रूपक्या**—तरी बघ निद्रेवांचून जसं स्वप्न नाहीं, किंवा रूपक आणि अतिशयोक्ति यांवांचून जसं काव्यवनाटक नाहीं, तसं योगावांचून भोग नाहीं !

**अतिशयोक्ति**—तो कां आतां ?

**रूपक्या**—इकडे ये जवळ म्हणजे सांगतों.

**अतिशयोक्ति**—घ्या ही आल्यें. सांगा आतां.

**रूपक्या**—( तिच्या गळ्यांत हात घालून ) हा झाला. योग आणि अगोदर असा योग असल्यावांचून ( चुंबन घेऊं लागतो ) कोणताच भोग सन्— ( ती निसटून दूर पळते. ) कां पटलं माझं म्हणणं !

**अतिशयोक्ति**—असं तोंडच बंद करूं लागल्यावर मग कोण नाहीं निरुत्तर होणार ! पण पुरे आतां. तें पहिलंत का—

( येथें पुढील भाषणाप्रमाणें जाळीच्या पडद्यांतून मागें
सर्व दरबारचा देखावा दिसूं लागतो. )

–महाराज पुनः आपल्या राजतेजानं चमकूं लागतांच सगळ्यांची मुखं कशीं टवटवीत दिसूं लागलीं.

**रूपक्या**—सूर्योदय होतांच वनश्री प्रफुल्लित दिसूं लागावी तशी !

**अतिशयोक्ति**—वहूंकडे अगदीं आनंदी आनंद भरून गेला आहे.

**रूपक्या**—पुष्पांच्या व धूपाच्या परिमलानं जसं देवगृह, कुशल गायकांच्या व मधुर वाद्यांच्या स्वरानं जसं नाटकगृह, अथवा शाकपाकांच्या घमघमाटानं जसं भोजनगृह परिपूर्ण भरून जावं तसं !

**अतिशयोक्ति**—बंदीजन महाराजांची स्तुति करताहेत, प्रजाजन त्यांच्या दर्शनासाठीं वाड्याकडे धांवताहेत, परिजन त्यांच्या सेवेला सादर होताहेत, गुरुजन त्यांना आशीर्वाद देताहेत, प्रणयीजन त्यांना पंचारतीनं ओवाळताहेत, साधुजन त्यांचा धन्यवाद गाताहेत—

**रूपक्या**—आणि दुर्जन हे मागं आपण केलेल्या निंदेबद्दल पूर्ण लज्जित होऊन वृक्षाच्या कोमेजलेल्या पानांप्रमाणं अधोवदन करून उभे आहेत !

**अतिशयोक्ति**—मच्छिंदरनाथ आणि जालंधरनाथ यांनीं स्वतः हातांनीं धरून महाराजांना राजसिंहासनावर बशविलं.

**रूपक्या**—मागं जसं वसिष्ठ विश्वामित्रांनीं सत्वधीर ठरलेल्या हरिश्चंद्राला पुनः राज्यपदारूढ केलं त्याप्रमाणं.

**अतिशयोक्ति**—आपल्या पुत्रानं इह लोकचंच नव्हे तर त्रैलोक्याचं स्वानंद-साम्राज्य श्रीगुरुकृपेनं मिळविलं याबद्दल मासाहेबांना कित्ती कित्ती धन्यता वाटते आहे !

**रूपक्या**—जशी रावणवधानंतर श्रीरामचंद्राला किंवा भारतीयुद्धानंतर पांडवांना राज्याभिषिक्त पाहून कौसल्येला किंवा कुंतीला धन्यता वाटली होती तशी !

**अतिशयोक्ति**—आमच्या राणीसाहेब व बाईसाहेब यांच्या आनंदाला तर नाहीं !

**रूपक्या**—अतिशयोक्तीचा वर्णनप्रकार जसा अमर्याद असतो तसा.

**अतिशयोक्ति**—आणि कोणत्याहि वर्णनांत झालं तरी रुपकं आपलीं तात्पुरत्याच अर्थांनीं मिसळलेलीं असतात त्याप्रमाणं अशाहि या उत्सवातिशयांत तें पहा ते सगळे योगीजन केवळ तात्पुरतेच दंग झालेले दिसताहेत !

**रूपक्या**—तें असो; पण हें पहा, कोणत्याहि गोष्टीचं दर्शन जोंपर्यंत दूर असतं तोंपर्यंतच तिचं रूपकातिशयोक्तीनं वर्णन चालणं बरं. पण दर्शनच आतां प्रत्यक्ष होण्याचा योग आल्यावर तुम्ही आम्ही एकीकडे व्हावं हेंच बरं !

( दोघे दोहों आंगांस होतात; पूर्वोक्त वर्णनाप्रमाणें दरबारचा थाटदार देखावा दृष्टीस पडतो. )

**जालंधरनाथ**—बच्चा गोपीचंद, यह राजजोगकु अच्छीतरहसे संभालना. फिर इस दुनियेके माया मोहसे बिलकुल भूलना नहीं. अब तेरी मनषा और क्या है ?

**गोपीचंद**—सांई महाराज—

( दिंडी; भैरवी )

**दिलें साम्राज्यचि मला त्रिभुवनाचें ॥ पार केलें भववासनार्णवाचे ॥ शिरीं धरिलें छत्रही निज कृपेचें ॥ काय उरलें प्रिय अतां करायाचें ॥**

—तथापि सर्वांच्या कल्याणाकरितां हें भरतवाक्य असो.

( पुढील पद्यानें वारांगनांचा नाच होतो. )

( चाल—किरदिगार तेरे हिसार० )

**निगमसार ॥ श्रुतिविचार ॥ व्यथितमना सदुपचार ॥ अति उदार ॥ सुखउतार ॥ करि हा भवनदीपार ॥ नि० ॥ बुधविहार सुमनहार ॥ विरातिस जणुं रतिस मार ॥ असार असार जरि पुकार ॥ वैभवान्वित भवा ॥ बनवुनि अविकार्य, देई ॥ सुख अपार अपार ॥ नि० ॥**



# नाटकाचा अंकानुक्रमानें सारांश.



गोपीचंदाची कथा प्रसिद्ध आहे; तेव्हां तिचा सारांश देण्याचें कारण नाहीं. तथापि या नाटकप्रयोगासाठीं तीच कथा कशी योजून घेतली आहे हें प्रेक्षकांस प्रत्यक्ष प्रयोग पहाण्यापूर्वी समजावें म्हणून अंकानुक्रमानें यापुढें येथें योजिलेलें त्या कथेचें संविधानक देतों. नाटक प्रयोगाच्या हस्तपत्रकावर घालण्यासाठीं याचा उपयोग होईल:—

**अंक पहिला**:—मंगलाचरण झाल्यावर गोरख व कानिफ यांची अकस्मात, भेट एकमेकांच्या गुरूंची माहिती, त्यांच्या मुक्ततेची प्रतिज्ञा.—कांहीं राजस्त्रिया गोपीचंदाच्या जलमंदिराकडे जात असतां जालंधर व महाराणी मैनावती यांच्या संबंधानें त्यांचीं भाषणें—मैनावती व गोपीचंद बोलत बसले आहेत तों कानिफनाथ आल्याचें त्यांना वर्तमान समजतें.—कानिफनाथांचा क्रोध शांत केल्यावर जालंधरनाथांना खाईतून काढण्याविषयींचा विचार होतो.

**अंक दुसरा**:—स्त्रीराज्याच्या हद्दीवरील मारुतीचें देवालय.—एका कर्नाटकी वारांगनेबरोबर स्त्रीवेषानें तबलजीचें काम पत्करून गोरखाचा स्त्रीराज्यांत जाण्याचा बेत.—हद्दीवरील चौकीवर प्रवाशांच्या तपासणीबद्दल चौकीदाराचा फाजील शहाणपणा—स्त्रीराज्यांतील परिमळा राणीचा दरबार, तेथें वारांगनेचें नृत्य, गोरखाची गुप्त सूचना, मच्छिंद्रनाथाची धांदल, उभयतांची भेट.—परिमळेची समजूत करून जालंधरनाथांच्या मुक्ततेसाठीं मच्छिंद्रनाथ व गोरखनाथ हे स्त्रीराज्यांतून निघतात.

**अंक तिसरा**:—गोपीचंदाची मुमुक्षुवृत्ति—मच्छिंद्रनाथ, कानिफ, गोरख येऊन खाईतून जालंधरनाथास बाहेर काढतात. गोपीचंदाचा जोग—गोपीचंदाची स्त्री मोहनाराणी व बहीण चंपावती बागेंत दासींसहवर्तमान करमणूक करीत बसल्या असतां गोपीचंदाची जोगीवेषानें भेट, त्यांचा संवाद. गोपीचंदाची मोहविन्मुखता जालंधरनाथांचा प्रसाद. जोगीवेष उतरून पुनः गोपीचंदाचें राज्यारोहण.

